





नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या महाराष्ट्र साहित्य पत्रिका ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून महाराष्ट्र साहित्य परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. हे अंक सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुररस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

अंक क्र. ३१४

जुलै-ऑगस्ट-सप्टेंबर २००५



मालतीबाई बेडेकर

अनुक्रमणिका

# ८० जी प्रमाणपत्र

म. सा. परिषदेस देणगी देणाऱ्यांना आयकर खात्याकडून '८० जी प्रमाणपत्र' प्राप्त व्हावे म्हणून गेल्या दोन वर्षापासून परिषदेचे प्रयत्न चालू होते. कळविण्यात आनंद होतो की, हे ८० जी प्रमाणपत्र परिषदेस नुकतेच प्राप्त झाले असून त्याची मूळ प्रत येथे प्रसिद्ध करीत आहोत. देणगीदारांना या प्रमाणपत्राचा निश्चितच उपयोग होईल. परिषदेच्या हितचिंतकांनी परिषदेस अर्थसाहाय्य करून कार्यकर्त्यांना प्रोत्साहित करावे, अशी विनंती आहे. इ. स. २००५-२००६ हे परिषदेचे शताब्दी वर्ष आहे. त्यासाठी विविध योजना व उपक्रम पार पाडण्यासाठी परिषदेतर्फे निधी उभारला जात आहे. सर्वांनी या निधीस सढळ हाताने मदत करावी, अशी विनंती आहे. आता पावतीच्या मागील बाजूस हे ८० जी प्रमाणपत्र मुद्रित करून घेतले जात असल्यामुळे वेगळ्या प्रमाणपत्राची गरज पडणार नाही. १०० वर्षांची वाटचाल पूर्ण करणाऱ्या या संस्थेस नवे-जुने सभासद, हितचिंतक व देणगीदार यांनी आर्थिक साहाय्य करावे, तसे आपल्या परिचितांनाही त्यावद्दल सांगावे, अशी नम्र विनंती. परिषदेस हे ८० जी प्रमाणपत्र प्राप्त होण्यासाठी मदत करणाऱ्या आयकर विभागातील संबंधित अधिकाऱ्यांची परिषद आभारी आहे.

सोबत : ८० जी प्रमाणपत्राची मूळ प्रत

**डॉ. गं. ना. जोगळेकर**
कार्याध्यक्ष, म. सा. प.

**No. Pn/T-I/80G/R $\frac{121}{131}$ / 2002-2003**

Donations made to Maharashtra Sahitya Parishad, Tilak Road, Pune– 4110 30., will be eligible for the benefit of deduction u/s 80G of the income-tax Act, 1961, in the hands of the donors subject to the limits and condition prescribed therein.

2. The exemption granted to the above Trust is valid from 1.4.2005 to 31.03.2008 subject to adherance of following :

1. Receipts iss}d to the donors should bear the Ref. No. and date of this order.

2. The return of income accompanied by Statement of Accounts and Income & Expenditure Account, Balance sheet of the ibid Trust/Society to be submitted to the concerned Accessing Officer as per the specified d} date laid fown in the Income Tax Act.

3. If further renewal is required an application in Form No. 10 G should be made to this Office by ibid trust/Society alongwith the statements of accounts for the last 3 years alongwith the copies of acknoledgements of returns of income, and Certificate u/s 13(1) (c) of the I.T. Act, 1961, signed by the Trustees alongwith list of donors of amount of Rs. 500/- & above for the last 3 years.

Sd/-
(S.K. Jha)
Commissioner of Income Tax-I, Pune

अनुक्रमणिका

महाराष्ट्र साहित्य परिषदेचे त्रैमासिक मुखपत्र



# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

अंक क्र. ३१४
जुलै-ऑगस्ट-सप्टेंबर २००५



संपादक
**डॉ. सु. प्र. कुलकर्णी**





**महाराष्ट्र साहित्य परिषद**
टिळक रस्ता, पुणे ४११ ०३०.
दूरध्वनी (०२०) २४४७५९६३

अनुक्रमणिका

# अनुक्रमणिका



---

**मुद्रक-प्रकाशक** : रवीन्द्र भट, प्रमुख कार्यवाह, महाराष्ट्र साहित्य परिषद, टिळक रस्ता, पुणे ४११ ०३०.

**मुद्रणस्थळ** : स्मिता प्रिंटर्स, १०१९ सदाशिव पेठ, पुणे ४११०३०.

**अक्षरजुळणी** : एच. एम. टाइपसेटर्स, ११२०, सदाशिव पेठ, निंबाळकर तालीम चौक, पुणे ४११०३०.

**किंमत १५/- रुपये**

**प्रकाशन दिनांक** : सप्टेंबर २००५

(या अंकात व्यक्त झालेल्या विचारांशी संपादक आणि संपादन-समिती नेहमी सहमत असेलच, असे नाही.)

## संपादकीय

महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या शताब्दी महोत्सवाच्या शुभारंभ समारंभानिमित्त–

**'स्वातंत्र्योत्तर काळातील मराठी साहित्याचे बदलते संदर्भ'** हा परिसंवाद आयोजित केला होता. त्या परिसंवादातील अभ्यासू वक्त्यांची भाषणे या अंकात प्रसिद्ध केली आहेत. डॉ. द. ता. भोसले - कादंबरी, प्रा. निशिकांत ठकार - काव्य, रंगकर्मी व नाटककार श्री. श्रीनिवास भणगे– नाटक आणि डॉ. अरविंद संगमनेरकर यांचे 'आरोग्यविषयक साहित्य' या चार लेखांचा यात समावेश आहे. डॉ. बाळ फोंडके यांचे 'विज्ञान कथा-कादंबरी' या विषयावरचे विचार या अंकासाठी उपलब्ध होऊ शकले नाहीत. पुढील अंकात त्याचा समावेश होईल.

स्वातंत्र्योत्तर काळात सामाजिक, राजकीय, सांस्कृतिक आणि भौतिकशास्त्रांत झपाट्याने बदल होत गेले. या काळाचे चरित्र - स्थिती आणि गती यांच्यातील संघर्ष किंवा समन्वय हा साहित्याचा विषय झाला का? अगदी हाताच्या बोटावर देता येतील इतकी उदाहरणे सोडली तर बाकी नैराश्यच पदरी येते. मराठी साहित्य रंजनवादाच्या भोवऱ्यात सापडले आहे. आता तर दूरदर्शनमुळे चांगला गायक आणि देखणा चांगला गायक यात दुसऱ्याचीच वर्णी लागते. अर्थगर्भ कवितेपेक्षा नाट्यपूर्ण रीतीने सादर करणारा मंचीय-कवी फड जिंकतो. टी-व्ही, मालिकांनी नाटक मारले का? दूरदर्शनच्या स्पर्धेत साहित्य अधिकाधिक रंजकतेकडे झुकू लागले आहे की काय, अशी काळजी वाटू लागली आहे.

असे असले तरी अ-कलात्मक, आक्रस्ताळी, बेगडी-जीवनदर्शन घडविणारे साहित्य हे कामचलाऊ व तात्कालिक असते. नव्या युगाची प्रसादचिन्हे दमदारपणे आपली मुद्रा उमटवीतच असतात. हा या परिसंवादाचा आशावादी समारोप आहे. या अंकाचे हे वैशिष्ट्य ठरावे.

**जन्मशताब्दीनिमित्त**

**विभावरी शिरूरकर** तथा मालतीबाई बेडेकर, तथा बाळूताई खरे - यांची जन्मशताब्दी १ ऑक्टोबर २००५ रोजी येत आहे, त्याची दखल घेतलीच पाहिजे. घरातील प्रगत वातावरण आणि घराबाहेरचे जुने संकुचित आणि बुरसटलेल्या विचारांचे जग यांतील घुसमटीतून त्यांचे स्त्री-हक्काच्या जाणिवेचे साहित्य जन्माला आले. 'कळ्यांचे निःश्वास' आणि 'हिंदोळ्यावर' या अनुक्रमे कथा आणि कादंबरीने १९३३ व १९३४ साली खळबळ उडविली. त्यांना टोपणनावाच्या पडद्याआड रहावे लागले. वैवाहिक समस्यांची थेट चर्चा करणाऱ्या 'विरलेले स्वप्न', 'जाई', 'शबरी', 'उमा' इ. १९३५ ते १९६६ च्या काळातील कादंबऱ्या आजही-अजूनही अंतर्मुख करतात. 'कुंपणाच्या कायद्याने' गुन्हेगार ठरविलेल्या मांग-गारुडी समाजाला अधःपतनाच्या खाईतून वर काढू पाहणारा शिकलेला आबा स्व-जातीकडूनच 'बळी' जातो. तो आजही अस्वस्थ आहे. 'घराला मुकलेल्या स्त्रिया व काळाची



अनुक्रमणिका





चाहूल' (१९६२) तसेच 'मनस्विनीचे चिंतन' (१९६९) हे वैचारिक ज्वालामुखी आजही धुमसत आहेत. हाडाच्या शिक्षिका श्रीमती मालतीबाई बेडेकरांनी समाजशिक्षिकेची भूमिका साहित्यरूपातून अमर केली आहे.

**कवी-ग. ह. पाटील** यांचे जन्मशताब्दी वर्ष १९ ऑगस्ट २००५ पासून सुरू झाले. बालमनावर सुसंस्कार करणाऱ्या आणि आजही थोरांच्या ओठांवर रेंगाळणाऱ्या अवीट गोडीच्या कविता 'देवा तुझे किती सुंदर आकाश', 'श्रावणबाळ', 'पाखरांची शाळा', 'माझ्या मामाची रंगीत गाडी हो'...अविस्मरणीय आहेत. कवी, कथाकार, शिक्षक, ट्रेनिंग कॉलेजचे प्राचार्य, शिक्षणतज्ज्ञ म्हणून ते प्रसिद्ध होते. रानजाई (१९३४), पाखरांची शाळा (१९६०), लिंबोळ्या (१९६१) हे त्यांचे काव्यसंग्रह. मला पंख असते तर व मजेदार बाळगोष्टी इ. बालकथासंग्रही प्रसिद्ध आहेत.

**'आनंद' मासिकाला** शंभर वर्षे होत आहेत. आजही बालरंजनाचे व्रत घेऊन उभे असलेले मासिक, महाराष्ट्र साहित्य परिषदेचे पहिले कार्यवाह कै. वा. गो. आपटे ह्यांनी सुरू केले. पुण्यात मळेकर-वाड्यातील साहित्यसंमेलनातच (१९०६) महाराष्ट्र साहित्य परिषदेची स्थापना झाल्याचे कै. तात्यासाहेब केळकर यांनी जाहीर केले; आणि लोकमान्य टिळकांनी आशीर्वाद दिले. महाराष्ट्र साहित्य परिषदेचे 'कै. वा. गो. आपटे संदर्भ ग्रंथालय' हे वा. गो. आपटे इस्टेट ट्रस्टच्या देणगीतून निर्माण झाले (१९५०). परिषदेचे कार्याध्यक्ष श्री. श्री. म. माटे यांनी ही देणगी मिळविली.

जन्मशताब्दीनिमित्त ह्या आठवणींना उजाळा.

**श्रद्धांजली**

लोकसाहित्याचे गाढे अभ्यासक डॉ. गंगाधर मोरजे १० जुलै २००५ रोजी वयाच्या ७५ व्या वर्षी काळाच्या पडद्याआड गेले. ज्ञानोदय-ग्रंथ सूचीचे कर्ते, अहमदनगर महाविद्यालयातील मराठी विभाग प्रमुख, जाणकार समीक्षक आणि अजातशत्रू व्यक्तिमत्त्व म्हणून ते प्रसिद्ध होते.

डॉ. हेमंत इनामदार आणि डॉ. मिरदेव-गायकवाड यांचे स्वतंत्र श्रद्धांजली लेख या अंकात आहेतच.

याशिवाय अतिवृष्टीमुळे यंदाचे वर्ष लक्षात राहील. त्यात बळी गेलेल्यांना श्रद्धांजली.

अखेर, गावरान गायकींने प्रसिद्ध झालेले गायक जयवंत कुलकर्णी यांनी भक्तिगीते, गझल, बालगीतेही गायिली. 'विठू माऊली तू', 'मनातल्या मनात मी तुझ्यासमीप राहतो', 'गाऊ मोटेवरचं गाणं', 'आमचा राजू का रुसला' ही त्यांच्या गळ्यातून प्रकटलेली गीते ओठाओठांवर रमलेली आहेत.

या आणि चुकून उल्लेख करावयाचा राहिलेल्या महनीय व्यक्तींना श्रद्धांजली.

**डॉ. सु. प्र. कुलकर्णी** (संपादक)
७, गायकवाड कॉलनी, सावेडी रोड, अहमदनगर, ४१४००३.
दूरभाष (०२४१) २४२९७५५.

# स्वातंत्र्योत्तर काळातील मराठी साहित्याचे बदलते संदर्भ : कादंबरी



डॉ. द. ता. भोसले

आपल्या मराठी साहित्यविश्वात मराठी कादंबरीला असलेले अनन्यसाधारण स्थान, तिची आजही असलेली लोकप्रियता, मराठी कादंबरीच्या समृद्ध आणि विकसित होत गेलेल्या परंपरेच्या पार्श्वभूमीवर उभी असलेली आजची कादंबरी, मराठी कादंबरी जगतातील मान्यवर असणारा कादंबरीकार, मराठी कादंबरीच्या वाचकवर्गाची मानसिकता अशा अनेक अंगांनी हा विषय मांडता येत असला तरी मर्यादित असलेल्या शब्दसंख्येचा विचार करता मी अगदी सूत्ररूपाने काही मुद्द्यांचे विवरण करण्याचे ठरविले आहे. ते मुद्दे खालीलप्रमाणे–

१. गेल्या ५०-६० वर्षांतील समाजजीवनात झालेले बदल कोणते? आणि त्या बदलांच्या निदर्शक अशा कोणत्या घटना सांगता येतील?

२. या बदलामुळे आपल्या प्रत्ययाला येणारी सामाजिक स्थिती – या स्थितीचे स्वरूप, वातावरण आणि आपली मानसिकता.

३. या साऱ्यांचे मराठी कादंबरीत घडणारे दर्शन.

४. आणि अखेरीला सामाजिक बदलांच्या संदर्भात मराठी कादंबरीचे यशापयश

या चार मुद्द्यांच्या आधारे सूत्ररूपाने विवरण करावयाचा मानस आहे.

गेल्या अर्धशतकात महाराष्ट्रापुरता विचार केला, तर कोणत्या महत्त्वाच्या घटना घडलेल्या सांगता येतील?

१) लोकशाही कारभारामुळे सत्तेचे झालेले विकेंद्रीकरण आणि त्यातून उदयाला आलेले ग्रामीण परिसरातले नवे नेतृत्व.

२) उदार धोरणामुळे शिक्षणाचा झालेला प्रसार–प्रचार.

३) वैज्ञानिक शोधांमुळे खेड्यांच्या अगदी काळजापर्यंत झालेली वैज्ञानिक आणि भौतिक प्रगती.

४) सहकार आणि कृषी-औद्योगिक धोरणांचा पाठपुरावा केल्याने कृषी उत्पन्नावर आधारलेल्या कारखान्यांचा उदय आणि विस्तार.

५) संयुक्त महाराष्ट्रासाठी करावी लागलेली चळवळ.



अनुक्रमणिका

६) कोयना-लातूर आदि भागांत झालेले भूकंप तसेच इतर नैसर्गिक आपत्ती.

७) १९७२ साली पडलेला अन् शेतकऱ्यांना देशोधडीला लावणारा दुष्काळ.

८) नामांतरांची दीर्घकाळ चाललेली चळवळ.

९) शेतकरी संघटनेचा झालेला उदय.

१०). राजकारण, शिक्षण आणि नोकरी यांच्यातील आरक्षणामुळे समाजात झालेले दृश्य आणि अदृश्य बदल.

११) यामुळे जात-जमात यांना येत चाललेले महत्त्व : त्यातून होणारे बाँबस्फोट : व झपाट्याने अध:पतित होत चाललेल्या राजकारणामुळे ढवळून निघत असलेला समाज : याशिवाय आणीबाणीचा प्रसंग; धर्माला येत चाललेले महत्त्व, चंगळवादामुळे बधिर व निष्क्रिय होत चाललेला समाज इ. गोष्टींचाही या बदलात समावेश करता येण्यासारखा आहे. आणखी बऱ्याच घटनाही महत्त्वाच्या आहेत; असे वाटण्याची शक्यता नाकारता येत नाही.

या आणि इतर काही घडामोडींमुळे समाजजीवनात काही आमूलाग्र बदल झाले. काही वरवरचे बदल झाले. सामाजिक स्थितीला वेगळी दिशा मिळाली. त्याचाच थोडासा अधिक विस्ताराने विचार करू. सत्तेच्या विकेंद्रीकरणामुळे ग्रामीण नेतृत्व उदयाला आले. सत्ता व पदांच्या जागांवर या नेतृत्वाने हक्क प्रस्थापित केला. सत्तासंपादनासाठी अघोरी स्पर्धा सुरू झाली. निरलस सेवेतून सत्ताप्राप्ती या सूत्राऐवजी आधी सत्तासंपादन आणि मग जमेल तशी सेवा हा विचार प्रबळ झाला. ग्रामपंचायत ते लोकसभा यांच्या दरवर्षी होणाऱ्या निवडणुकींमुळे विकृत झालेले राजकारण अगदी चुलीपर्यंत जाऊन पोहोचले. निवडणूक जिंकण्यासाठी अनेक गैरमार्गांचा वापर सुरू झाला. शिवाय त्याला प्रतिष्ठाही मिळत गेली. बेकार तरुणांचे तांडे विविध पक्षांच्या तंबूत डेरेदाखल होऊ लागले. ग्रामीण परिसराचा आर्थिक विकास करणारे सहकारी कारखाने भ्रष्टाचाराच्या किडीने पार पोखरून गेले.

वारंवार पडणारे दुष्काळ, बेभरवशाची झालेली शेती, ग्रामीण पातळीवर पदोपदी येणारी जातीय तेढ, गुंडगिरीमुळे आक्रसून जाणारे जीवन; रोजगाराअभावी गरिबांची होणारी उपासमार, वर्णवर्चस्वामुळे जीवनाला आलेली असुरक्षितता यांसारख्या काही मूलभूत कारणांमुळे खेड्यांतील गोरगरीब आणि दलितांचा लोंढा पोटासाठी शहरांकडे धावू लागला; आणि कसातरी जगण्यासाठी धडपड करू लागला. स्वाभाविकच शहरे फुगली. झोपडपट्ट्या शहराच्या चारी अंगांनी चिपकल्या. त्यातून मग नानाविध प्रश्न निर्माण झाले. या प्रश्नांचा विस्तार करण्याचे तूर्त कारण नाही. शिक्षणप्रसारामुळे खेड्यांतील मुले शिकली. दोन नोकरीला लागली, दहा बेकार म्हणून भरकटत राहिली. मात्र शिक्षणातून त्याला एक प्रकारचे आत्मभान प्राप्त झाले. समाजस्थितीचे विश्लेषण करण्याची क्षमता प्राप्त झाली. त्याचबरोबर सहकारी कारखानदारीमुळे सामान्य शेतकऱ्यांकडे दोन पैसे दिसू लागले, पण अशा शेतकऱ्यांची संख्या अगदीच नगण्य. अधिक प्रमाणात आतबट्ट्याच्या शेतीव्यवसायामुळे कर्जबाजारी झालेला शेतकरी ती विकून मजूर म्हणून शहरांच्या आश्रयाला आला. आधीच बेकार



अनुक्रमणिका

झालेल्या गिरणी कामगारांच्या लोंढ्यात सामील झाला.

एके काळी समाजजीवनाला नेतृत्व देणारा, चिरंतन मूल्यांची साधना करणारा, प्रागतिक विचारसरणीला गती देणारा मध्यमवर्गही आत्मतुष्ट बनला. आत्मकेंद्रित होऊन 'स्व'च्या परिघातच रमत गेला. आपल्या छोट्याशा प्रापंचिक जीवनात भौतिक सुखविलासांची रेलचेल करून तृप्त जीवन जगू लागला. शिवाय तो आता राजकारण, शिक्षण नि प्रशासन यांच्यापासून बाजूला फेकला गेल्याने त्याने चांगल्या पगाराच्या अपेक्षेने परदेशांवर डोळा ठेवला. पाश्चात्त्य संस्कृतीचा झपाट्याने होत चाललेला प्रभाव; भौतिक सुखांची सुरू झालेली रेलचेल, दूरदर्शन आणि इतर साधनांनी निर्माण केलेले गारुड, त्यातून लोकप्रिय आणि प्रतिष्ठित होत चाललेली चंगळवादी जीवनशैली, या जीवनशैलीचा वाचनसंस्कृतीवर होऊ लागलेला अनिष्ट परिणाम आणि साहित्याकडे पाहण्याचा त्यांचा असलेला मनोरंजनवादी दृष्टिकोन या सर्व गोष्टींमुळे सारा समाजच बधिर झाला आहे, असे जाणवते आहे. समाजात झालेला हा आंतरिक बदल म्हणावा लागेल.

मराठी साहित्यावर मूलगामी बदल करणारी सामाजिक घटना म्हणजे नव्याने लेखन करणारा दलित आणि दलितेतर लेखकवर्ग, हा होय. ग्रामीण भागात झालेल्या शिक्षण प्रसारामुळे शेकडो दलित व दलितेतर मुले शिकली. शहाणी झाली. तशीच ती अंतमुर्खही झाली. आपल्या दैन्य, दुःख, दारिद्र्य, उपेक्षा आणि शोषण याला जबाबदार कोण, याची त्यांना मीमांसा करावीशी वाटली. आपल्यावर झालेल्या अन्यायाचे दर्शन जगाला घडवावे, आम्ही आणि आमच्या मागच्या पिढीने काय भोग भोगले हे व्यक्त करीत असतानाच हक्काची जाणीव झालेला हा नवा दलित तरुण गुलाम बनविणाऱ्या साऱ्या समाजव्यवस्थेला नकार देण्याइतका, त्यांचा धिःकार करण्याइतका आक्रमक बनला आणि त्यातूनच आजपर्यंत कधीही व्यक्त न झालेले त्यांचे अभावग्रस्त जीवन साहित्यात येऊ लागले. त्यामुळे एक नवा, रसरशीत अनुभव मराठी साहित्यात व्यक्त झाला. भेदक स्वरूपाचे वास्तव मराठी जीवनातील नवे जग दाखविण्याइतके वेगळे ठरले. सक्षम बनले.

मागे उल्लेख केलेल्या घटनांमुळे समाजजीवनावर जाणवणारे परिणाम थोडक्यात सांगावयाचे झाले तर असे सांगता येतील. स्त्रियांच्या शिक्षणामुळे नि घराबाहेर पडून जीवनाच्या हरेक क्षेत्रात तिने गाजविलेल्या कर्तृत्वामुळे स्त्रीकडे पाहण्याचा समाजाचा दृष्टिकोन पार बदलून गेला. स्त्री-पुरुष नात्यातील वातावरण निकोप नि निरोगी होत गेले. तिच्याकडे एक गुलाम म्हणून पाहण्याची भूमिका बदलली. नोकरी-व्यवसायामुळे पूर्वीची एकत्र कुटुंबपद्धती पार मोडीत निघाली. शिक्षण आणि विज्ञान यांच्या परिणामामुळे धार्मिक स्वरूपाच्या अंधश्रद्धा व ताठर बनलेल्या परंपरा कमी होत गेल्या. शिकलेली तरुण पिढी आपल्या पिढीजात शेतीचा तिरस्कार करू लागली. खेड्यांचा पारंपरिक चेहरा बदलला. तो अधिक चकचकीत झाला. शहरी सुधारणांचा पायरव ग्रामीण भागामध्ये झपाट्याने ऐकायला येऊ लागला. रस्ते, वीज, नळ, हॉटेल, वाहने, स्टोअर्स, दूरदर्शन, वृत्तपत्रे, फोन आणि इतर अनेक सुखोपभोगाच्या



अनुक्रमणिका

साधनांची रेलचेल खेड्यांत होत गेली. त्यातून नकळत पाश्चात्त्य संस्कृतीचा पगडा ग्रामीण जीवनशैलीवर बसलेला आपण पाहतो आहोत, अशा प्रकारचे बदल हे एखाद्या नाट्यमय घटनेतून होत नसले तरी समाजजीवनात अशा बदलांचाही खोलवर परिणाम होत असतो, हे आपणाला नाकारता येणार नाही.

अशा छोट्या-मोठ्या आणि तात्कालिक नि चिरस्थायी परिणाम करणाऱ्या घटनांतून जे समाज-स्थित्यंतर झाले; त्याचे चित्रण मराठी कादंबरीमध्ये किती झाले, कसे झाले याचा आढावा घेणे आवश्यक आहे. या साऱ्या गोष्टींचे विस्तृत आणि सोदाहरण विवेचन करणे शक्य नसले तरी काही ठळक विशेषांचा अथवा स्थित्यंतरांचा उल्लेख करीत जाणे अनाठायी ठरणार नाही. समाजाचा बदललेला जीवनविषयक दृष्टिकोन, जीवनमूल्यांचा बदललेला अग्रक्रम, साहित्याकडून केल्या जाणाऱ्या अपेक्षा, समाजाच्या सर्व सामाजिक स्तरांतून उदयाला आलेला नवा लेखकवर्ग, अभिरुचीचे बदललेले स्तर या आणि अशाच आणखी काही कारणांनी मराठी कादंबरीच्या निर्मितीवर विविधस्वरूपी परिणाम झाला. त्यातूनच या कादंबरीला बरीच विविधता आली. काही नवीन आस्थाविषय व्यक्त झाले. या स्थित्यंतराचा परिपाक म्हणून राजकीय कादंबरीला नव्याने पालवी फुटली. ग्रामीण आणि दलित साहित्याला वेग आणि बहर येत गेला. समाजाच्या उपेक्षित स्तरांचे दर्शन घडविणाऱ्या कादंबऱ्यांची निर्मिती होऊ लागली. एवढेच नव्हे तर स्त्रीवादी भूमिकेतून स्त्री-जीवनाचे चित्रण; महानगरी जीवनाला घेरणाऱ्या झोपडपट्ट्या; तुंबलेल्या गटारासारखे असणाऱ्या जीवनाचे दर्शन, एकलेपणाने 'आतून' मोकळे होत चाललेल्या माणसाचे रितेपण प्रकट करणाऱ्या अस्तित्ववादी कादंबरीला येत चाललेला ठळकपणा, अशा अनेक गोष्टी या सामाजिक स्थित्यंतराच्या निदर्शक म्हणून सांगता येतील. धावपळीच्या जीवनात थोडाफार विसावा मिळावा; थोडेफार मनोरंजन व्हावे; यासाठी भरभरून निघणारे स्वप्नरंजनपर कादंबरीचे पीकही या काळात जोरात आलेले होते. प्रा. फडके आणि प्रभृतींनी आधीच लोकप्रिय केलेली ही रंजनवादी कादंबरी त्यांच्या अनुयायांनी तशीच हिरवीगार ठेवली. या मधल्या काळात काकोडकरांसारख्या लेखकाने दरमहा दोन-दोन कादंबऱ्या लिहून वेगळ्या अर्थाने विक्रम करून टाकला. प्रेमाचा ठराविक त्रिकोण घेऊन त्यात मालमसाला भरणाऱ्या इतर लेखकांनी याच वाटेवरून घोडदौड केली. अशा कादंबरीच्या जवळपास जाणाऱ्या ऐतिहासिक, पौराणिक आणि चरित्रपर कादंबरीलाही भरपूर उधाण आले. या चरित्रपर कादंबरीसाठी मग म. गांधींपासून सावरकर, आंबेडकरांसारखे महापुरुष वापरण्यात आले. ज्ञानेश्वरांपासून तो समर्थ रामदासांपर्यंतचे संत वेठीस धरले गेले. रामायण-महाभारतातील व्यक्तींच्या जीवनावर कादंबरी लिहून काहींनी तर मम्मटांनी सांगितलेल्या 'अर्थम्-यशसे' या हेतूंची काठोकाठ तृप्ती करून घेतली. म्हणजे एका बाजूला चांगले लेखक कसदार जीवनाचे दर्शन घडविणाऱ्या कादंबऱ्या लिहीत होते; तर दुसऱ्या बाजूला जीवनातील दु:खाची विस्मृती होणारी कादंबरी 'रेडिमेड' पद्धतीने तयार करीत होते, तर तिसऱ्या बाजूला ज्ञात असलेल्या थोरांच्या चरित्राला कादंबरीचे तिखट-मीठ लावून वाचकांच्या

ताटात नवा नि ताजा पदार्थ म्हणून वाढत होते आणि याच वेळी, याच काळात गमतीची गोष्ट अशी की, भक्ती, आरोग्य, प्रसाधन, खाद्यपदार्थ यांच्यावरील पुस्तकांची लाट आलेली होती. मधुमेह, हृदयविकार, कॅन्सर व सुंदर दिसण्यासाठी करावयाच्या नानाविध गोष्टी यांच्यावरील पुस्तकांनी तर विक्रीचे उच्चांक मोडलेले होते. याचा आणखी एक अर्थ असा की, उच्च आणि निकोप आनंद देणाऱ्या कथा-कादंबरीपेक्षा क्षणिक सुखमय गोष्टींना म्हणजे पुस्तकांना अधिक प्रतिष्ठा येत चाललेली होती. बदलत्या सामाजिक स्थितिगतीचे नि मनोवृत्तीचे हे निदर्शक म्हणावे लागेल आणि आजही हे चित्र फारसे बदलले नाही.

बदललेल्या सामाजिक स्थितिगतीचे दर्शन ग्रामीण आणि दलित साहित्यात फार चांगल्या प्रकारे घडते. पन्नास-पंचावन्न वर्षांपूर्वी ग्रामीण साहित्याची निर्मिती होत होती हे खरे; तिचे वाङ्मयीन मोठेपणही नाकारता येत नाही हेही तितकेच खरे, पण या वीस-तीस वर्षांपासून ग्रामीण साहित्याच्या निर्मितिसंदर्भात खूप मोठे परिवर्तन झाले. प्रारंभीच्या काळात साधनभूत असलेली ग्रामीण कादंबरी आज साध्यभूत झालेली आहे. स्वप्नरंजनाच्या दलदलीत अडकलेली तेव्हाची ग्रामीण कादंबरी, आपल्या भेदक आणि भीषण वास्तवाच्या दर्शनाने वाचकांना प्रभावित करू लागली आहे. सुखवस्तू शेतकरी कुटुंबात रमलेली ग्रामीण कादंबरी या शेतकरी जीवनाच्या चित्रणाबरोबरच शेतीवर अवलंबून असलेल्या तळागाळातल्या माणसाच्या फाटक्या संसारातही तेवढाच रस घेते आहे. किंबहुना असे म्हणता येईल की, सर्वांगाने चेपलेले ग्रामजीवन हा आता ग्रामीण कादंबरीचा केंद्रबिंदू झाला आहे. कालपरवापर्यंत नाटक-सिनेमात आणि काही नागरजीवनावरील कादंबरीत झाडलोट करणारा; घरगड्याचे काम करणारा अडाणी शेतकरी आता या कादंबरीत नायकपदी विराजमान झाला आहे. या नायकाचा ढोरकष्टावर तोलून धरलेला; तरीही विस्कटून गेलेला; जाच-काच; ताप आणि शाप यांनी आतून-बाहेरून करपून गेलेला संसार आता कादंबरीचा प्राणभूत घटक झाला आहे. दाहक अन् भेदक स्वरूपाचे वास्तव कोणत्याही अन्य आमिषाला बळी न पडता; अतिशय गांभीर्याने, तितक्याच कलात्मकतेने, वर्तमानातील ठसठसणारी वेदना पकडीत आज तरुण कादंबरीकार साकार करतो आहे. यातले बहुतेक तरुण लेखक आजही ग्रामीण जीवनाशी निगडित आहेत. तिथल्या मातीतच पाय रोवून उभे आहेत. याचा फायदा असा की, ग्रामीण जीवनाचा धुमसता वर्तमान ते स्वत: अनुभवत असतात. स्वत:च्या अंगावर घेऊन खेळवितात. त्यामुळे नव्याने निर्माण झालेले प्रश्न व समस्या ते अधिक बारकाईने, अधिक आस्थापूर्वक, अधिक उत्कटतेने नि भेदक स्वरूपात प्रकट करीत आहेत. एखादा लेखक ग्रामजीवन चित्रित करताना खेड्यात राहतो की, शहरात राहतो याला फारसा अर्थ नसला तरी दारिद्र्य आणि दुष्काळ यांच्यामुळे वरून आकाश आग ओकत असलेले अन् खालून धरती चटके देत असताना त्यांचा स्वत: अनुभव घेणारे मन तो अनुभव अधिक ताकदीने व्यक्त करील, असे म्हणता येईल. आज घडीला मागच्या पिढीतील मान्यवर ग्रामीण कादंबरीकारांबरोबर नवोदित असे सुमारे दहा-बारा तरी कादंबरीकार ग्रामीण कादंबरीला



अनुक्रमणिका






समृद्धी आणत आहेत. या प्रत्येकावर स्वतंत्रपणे लिहिता येईल एवढे त्यांचे योगदान आहे. त्यांच्या कादंबऱ्यांचे वेगळेपण जाणवते. हे जाणवणारे वेगळेपण म्हणजे सामाजिक स्थित्यंतराचेच त्यांनी केलेले विश्लेषण आहे, असे म्हणता येईल.

नवोदित ग्रामीण कादंबरीकारांप्रमाणेच दलितांच्या भेगाळलेल्या जीवनाचे चित्रण दलित कादंबरीकारांनी तितक्याच ताकदीने चित्रित केले आहे. १९६० नंतरच्या सामाजिक स्थित्यंतराचेच हे निदर्शक आहे. शिक्षणामुळे आत्मभान आलेला दलित तरुण; बाबासाहेब आंबेडकरांनी केलेल्या क्रांतिकारी परिवर्तनाचा साक्षीदार असलेला तरुण स्वातंत्र्य, समता, बंधुभाव आणि मानवता यांचा पुकारा करीत जसा कवितेतून व्यक्त होत होता, तसाच तो कादंबरीतून व्यक्त झाला आहे. मात्र कवितेत झेललेले अन्याय, पचविलेला दुःखभोग, तिरस्कृत अस्पृश्यता आणि भोगलेली गुलामगिरी यांचे जळजळीत कढ प्रकट करीत होता, तसा आविष्कार थोड्याशा कमी प्रमाणात कादंबरीद्वारे व्यक्त झाला आहे. जातिपातीच्या तटभिंती अजूनही माणसाच्या मनामध्ये कशा रुतून बसलेल्या आहेत, यांचे दर्शन या लेखकांनी आपल्या कादंबरीतून घडविले. कपाळावर कोरलेली जातीयतेची म्हणजे अस्पृश्यतेची तप्तमुद्रा; जन्मापासून अखेरपर्यंत दारिद्र्याने केलेली सोबत; माणसाला पशुपातळीवर नेणारी भुकेची आग आणि या साऱ्यांमुळे विस्कटून गेलेले अवघे आयुष्य यांचे घायाळ करणारे दर्शन अण्णाभाऊ साठेंपासून तो भीमसेन देठे नि बाबूराव बागूलांपासून तो विजय शिरसाठपर्यंत अनेकांनी मोठ्या ताकदीने व्यक्त केले आहे.

सामाजिक स्थित्यंतरांमुळे मानवी जीवनावर जसा परिणाम झाला तसा तो जीवनदृष्टीवर झाला. याची ठळक खूण म्हणजे स्वातंत्र्योत्तर काळानंतर निर्माण झालेले स्त्री-जीवनाचे चित्रण हे होय. शिक्षणाने आत्मविश्वास आलेली; घराच्या बाहेर पडून नानाविध क्षेत्रांत कर्तृत्व गाजविणारी, केवळ गृहिणीच्या भूमिकेत स्वतःला जखडून न घेणारी, पुरुषी व्यवस्थेने घातलेल्या बंधनाविरुद्ध बंड करणारी, समता नि व्यक्तिस्वातंत्र्याची मागणी आग्रहाने करणारी, स्त्री-पुरुष संबंधांकडे मोकळेपणाने नि परस्परपोषकतेच्या भावनेने पाहून वागणारी, पारंपरिक रिवाज-रूढींतील निरर्थकता जाणवल्याने त्यांचा त्याग करणारी, पुरुषाच्या खांद्याला खांदा लावून कर्तृत्व गाजविणारी, कामभावनेकडे समंजस भूमिकेतून पाहणारी; स्त्री म्हणून समान हक्क, समान संधी, समान न्याय, आणि समान दृष्टिकोन यांची मागणी करणारी, विवाहबंधनाचा काच होत असेल तर त्यातून मुक्त होण्याचे धाडस करणारी अन् 'सेकंड सेक्स' च्या नावाखाली दुय्यम वागणुकीचा अधिक्षेप करणारी एका वेगळ्या व्यक्तिमत्त्वाची आणि कर्तृत्वाची स्त्री या पन्नास-साठ वर्षांतील मराठी कादंबरीमध्ये आपणास भेटते. रूढीने विवर्ण केलेली, कष्टाने विरून गेलेली, घरसंसारात अजूनही नगण्य स्थान असलेली स्त्री ग्रामीण-दलित कादंबरीत आढळते, हे मान्य असले तरी एकूण मराठी कादंबरीतील स्त्री-चित्रणाचा विचार करता तिची जाणवणारी प्रतिमा अशी कर्तृत्वसंपन्न आणि आत्मसन्मानोत्सुक स्त्रीची आहे, असेच म्हणावे लागेल. स्त्रीवादी भूमिकेतून लेखन करणाऱ्या लेखिकांच्या कादंबरीतील स्त्री

तर पुरुषी अहंकार नि प्रभुत्वभावना कुरवाळणाऱ्या वाचकांना न पेलवणारी-स्वीकारता न येणारी अशीच आहे. अर्थात अगदी अलीकडच्या काही लेखिका केवळ वेगळे लिहिण्याच्या वृत्तीतून टोकाची नि अविवेकी भूमिका घेत आपल्या नायिकेला एका हातात हातोडा नि दुसऱ्या हातात यच्चयावत गोष्टींचा निषेध करणारा बंडाचा झेंडा देत आहेत, असेही दिसून येते. त्याशिवाय विवाहसंस्थेचा चक्काचूर होणार नाही, प्रेम, पावित्र्य, नीतिकल्पना यांची जळमटे निघणार नाहीत, अशी त्यांची भावना झालेली दिसते. अशी सर्व गोष्टींना लाथाडण्याची वृत्ती सोडली तर बाकीचे स्त्रीचित्रण खरोखर सर्वस्वी वेगळे आहे. परंपरेत खारावलेल्या समाजमनाला देखील ते अंतर्मुख केल्याशिवाय राहणार नाही. स्वातंत्र्यानंतर बदललेल्या सामाजिक स्थितीचाच हा परिपाक म्हणावा लागेल.

जीवनाच्या सर्व क्षेत्रांत अगदी तळापर्यंत राजकारणाचे पाणी जाऊन पोहोचले असले तरी मराठीत राजकीय जीवन चित्रित करणाऱ्या कादंबऱ्यांची संख्या तुलनेने कमी आहे आणि उत्तम राजकीय कादंबरीलेखन करणाऱ्या लेखकांची संख्याही तशी खूप कमी आहे. मराठी माणसाला राजकारणावर भरभरून चर्चा करायला आवडते. राजकारणाचे चार-दोन डावपेच खेळायला आवडते. राजकारणात असलेल्या व्यक्तीच्या भल्या-बुऱ्या गोष्टी ऐकायला नि सांगायला आवडतात. एवढेच नव्हे तर राजकीय व्यक्तीला विभूतिपद देऊन त्याच्या थोरवीपुढे झुकायलाही आवडते; पण राजकीय जीवनाचा कलात्मक दृष्टीने एक गजबजलेला 'पट' उलगडून दाखविणे फारसे आवडत नसावे. त्यामुळेच मराठीत फार कमी कादंबरीकार आढळत असावेत. त्यातही माडखोलकरांनी पूर्वी राजकीय तत्त्वचर्चा करीत (तीही गांधीजी कसे चुकले, यांची चहा पिता पिता टेबलाभोवती चर्चा व्हायची.) जशी एक अ-कलात्मक राजकीय कादंबरी निर्माण केली; तशी आता राजकीय मंडळींच्या भानगडी, त्यांची कटकारस्थाने, त्यांनी केलेली बायकांची लफडी, त्यांचा भ्रष्टाचार, राजकारणातल्या लोकांची केलेली फसवणूक, राजकीय सत्तेसाठी चालणारी कुरघोडी आणि निवडणुकीसाठी वापरलेली हिंस्र साधने यांचेच भडक आणि एकांगी चित्रण या राजकीय कादंबरीमध्ये आपणास पाहावयास मिळते. राजकारणातील व्यक्तीचे नाटकी वागणे-बोलणे, तिची खोटी नम्रता, तिची मुखवटे धारण करून वागण्याची पद्धत, तिची रसिक आणि रंगेल वृत्ती; तिचा जनसेवेविषयीचा खोटा कळवळा आणि हाती आलेल्या सत्तेचा गैरवापर करून कमावलेली अमर्याद धनसंपदा या चित्रणावरच अधिक भर दिलेला राजकीय कादंबरींमध्ये दिसतो. हे चित्रण पूर्णत: असत्य आहे. विकृत आहे असे म्हणता येत नसले तरी, या राजकारणी मंडळींची ही एवढी एकच बाजू नाही; त्यांची दुसरीसुद्धा एक बाजू आहे. राजकारणात असलेल्या अनेकांनी सहकाराच्या माध्यमातून आपापल्या भागाचा केवढा तरी कायापालट करून दाखविला आहे. सहकाराच्या माध्यमातून हजारो शेतकऱ्यांच्या जीवनात सर्वांगीण क्रांती घडविली आहे. त्यांचे आर्थिक जीवन उंचावले आहे. कृषि-औद्योगिक कारखानदारीतून सर्वांगीण विकासाचा ध्यास घेतलेले राजकारणी येथे कमी नाहीत. या मंडळींनी कृषिपूरक उद्योग स्थापन केले आहेत. शाळा-

महाविद्यालयांची स्थापना करून ग्रामीणांची सोय केली आहे. दुग्धोपादनास गती दिलेली आहे. वसतिगृहातून आणि आरोग्यकेंद्रातून सामान्य माणसांची गैरसोय दूर केली आहे. बँका, खतकारखाने, वृक्षारोपण, पशुसंवर्धन, विविध वस्तूंची ग्राहकसेवा केंद्रे, यांच्याद्वारे ग्रामीण माणसाचा जीवनस्तर उंचावला आहे. कामगारांच्या मुला-मुलींना मदत केली आहे. शेतीच्या पाण्यासाठी स्वत:च्या योजना राबविल्या आहेत; सामुदायिक विवाहासारखे उपक्रम राबवून गरीब माणसाची कर्जातून मुक्तता केलेली आहे. एका दृष्टीने साऱ्या सुधारणा आणि सुखसोयी यांची ही समृद्ध अशी ओॲसिसच त्यांची निर्माण केलेली आहेत. राजकारणी व्यक्तींनी केलेली ही विधायक नि लोकोपयोगी कामे आमच्या राजकीय कादंबरीत सहसा येत नाहीत. ग्रामजीवनाची आमूलाग्र व्यवस्थाच यातून पार बदलून गेलेली आहे; पण हे ठळकपणे कादंबरीत येत नाही. येत असेल तर त्याने सुरू केलेल्या रचनात्मक कामातील भ्रष्टाचार येतो; त्यातील अपुरेपणा येतो. त्याने निर्माण केलेल्या साम्राज्यातून जाणवणारी दहशत फार तर अतिशयोक्त पद्धतीने आमच्या राजकीय कादंबरीत येते. त्याने उभे केलेले अनेक गरिबांचे प्रपंच चित्रित होत नाहीत; त्या गरिबाला या नेत्याने कसे लाचार बनविले आहे, यावरच भर दिला जातो. ग्रामीण भागातील राजकीय पुढारी सगळेच बदमाश असतात; अशातला भाग नाही. गरज आहे ती निकोप दृष्टीने समाजाचा झालेला विकास जाणून घेण्याची. तरीही राजकीय कादंबरीने पूर्वसुरींची वाट न चोखाळता हा जो नवा मार्ग आपल्या चित्रणातून दाखविला तो स्वातंत्र्यानंतर झालेल्या राजकीय स्थित्यंतराचा परिपाक म्हणावा लागेल.

सामाजिक स्थित्यंतराचा परिपाक म्हणून आदिवासीच्या जीवनाचे दर्शन मराठी कादंबरीत येऊ लागले आहे. नव्याने निर्माण होणाऱ्या प्रश्नांची दखल मराठी कादंबरी घेते आहे. पर्यावरण आणि पाणीटंचाई यांच्याकडेही मराठी कादंबरी आता अंगुलीनिर्देश करू लागली आहे. भेदक आणि भीषण स्वरूपाच्या वास्तवाचे मूळ शोधण्याची धडपडही या लेखनात जाणवते आहे आणि समाजाच्या सर्वांगीण प्रगतीसाठी कोणतीही एक तत्त्वप्रणाली आज उपयोगी पडत नाही याचेही भान आजच्या कादंबरीकाराला येत चालले आहे. मग ही तत्त्वप्रणाली साम्यवाद असो, समाजवाद असो, गांधीवाद असो वा पुंजीवाद असो.

थोडासा तुलनात्मक विचार केला तर आजची आपली मराठी कादंबरी, कन्नड, तमिळ, बंगाली भाषेतील कादंबरीपेक्षा जीवनदर्शनाच्या संदर्भात थोडीशी कमी भासत असली तरी तिच्यातून आजपर्यंत जे व्यक्त झाले आहे; ज्या गोष्टींवर मराठी कादंबरीने विशेष भर दिला आहे; ज्या गोष्टी आशादायक म्हणून नमूद कराव्याशा वाटतात; त्याही तेवढ्याच समाधान देणाऱ्या आहेत. ढोबळ स्वरूपात त्यांची नोंदच करावयाची झाली तर अशी करता येईल,

१. सामान्यातला सामान्य माणूस केंद्रस्थानी ठेवून मराठी कादंबरीने वाटचाल सुरू ठेवलेली आहे.

२. मराठी कादंबरीने मानवी जीवनाची महत्ता सातत्याने अधोरेखित केलेली आहे.

३. या जीवनाकडे पाहण्याचा दृष्टिकोन ज्याला 'सिनिक' म्हणता येईल असा जवळजवळ आढळत नाही.

४. माणसाच्या माणूसपणावर, चिरंतन मूल्यांवर असलेली निष्ठा मराठी कादंबरीत ढळलेली नाही.

५. स्वातंत्र्य, समता, मानवता अशा काही गोष्टींचा ध्यास मराठी कादंबरीत जाणवतो.

६. शहरीकरण, यांत्रिकीकरण आणि औद्योगिकीकरण यातून येणाऱ्या रितेपणावर आणि एकाकीपणावर या कादंबरीने बोट ठेवलेले आहे.

७. कल्पिताचा कसलाही साज न चढविता भेदक वास्तवाला थेट भिडण्याची वृत्ती आजच्या कादंबरीत आढळते.

८. तळागाळातील लेखनाची सशक्त अभिव्यक्ती या कादंबरीत होताना जाणवते.

९. नव्याने निर्माण होत असलेल्या सामाजिक प्रश्नांचे भान ही कादंबरी देत आहे.

१०. आणि लोकप्रियतेचा व मान्यतेचा विचार न करता जमेल तेवढी प्रयोगशीलता मराठी कादंबरीत आढळते.

या आशादायक स्वरूपाच्या गोष्टी तिच्या अधिक चांगल्या प्रगतीची प्रसादचिन्हे मानायला हरकत नसावी.

**डॉ. द. ता. भोसले**

हॉटेल नागालँडमागे, पंढरपूर, जि. कोल्हापूर (०२१८६) २२३७६६

❑

---

## साभार पोच

**परदेशी शकुन कल्पना साधर्म्य-वैधर्म्य :** म. वि. गोखले, प्रतिमा प्रकाशन, पुणे, पृष्ठ १२०

**मौनात एकट्याशी :** संतोष कुलकर्णी, स्वयम् प्रकाशन, उदगीर, पृष्ठ ९६

**प्रिय सखी :** ज्योती कपिले, वंदना प्रकाशन, मुंबई, पृष्ठ ६४

**कर्णबधिरांकरता घरच्या घरी मार्गदर्शन :** अनुराधा पाठक, देशमुख आणि कंपनी प्रा. लि. पुणे, पृष्ठ ५०

**मनाचिये अंधाराचा :** शशिकला उपाध्ये, चंद्रकला प्रकाशन, पुणे, पृष्ठ १४८

**महिलांचे कायदे :** अर्चना मेढेकर-मराठे, साकेत प्रकाशन प्रा. लि. औरंगाबाद, पृष्ठ ४०

**आनंदघन :** बाबा भांड, साकेत प्रकाशन प्रा. लि. औरंगाबाद, पृष्ठ २०८

**आवर्त :** म. वि. कोल्हटकर, साकेत प्रकाशन प्रा. लि. औरंगाबाद, पृष्ठ १९४

**आदिम प्रकाशन चित्रे :** लखनसिंह कटरे, हरिवंश प्रकाशन, चंद्रपूर, पृष्ठ १६

**लव्हाळ्या :** अरुण नरसाळे, स्वप्नोदय प्रकाशन, मिरजगाव, पृष्ठ २५२

**कांताबाई सातारकर :** संतोष खेडलेकर, वैष्णवी प्रकाशन, संगमनेर, पृष्ठ १००

# स्वातंत्र्योत्तर काळातील मराठी साहित्याचे बदलते संदर्भ : कविता



निशिकांत ठकार

साहित्याचे आणि विशेषत: कवितेचे वास्तवजीवनाशी असणारे संदर्भ हे समांतर किंवा बिंब-प्रतिबिंब भावात्मक असतीलच असे नाही. कविता ही सृजनात्मक कल्पना असते आणि ती शब्दातून साकारते. तिचे प्रयोजन वास्तवाचे चित्रण करणे किंवा वास्तवाची जाणीव करून देणे एवढ्यापुरतेच मर्यादित नसते. तिचा संबंध रोजच्या जगण्यातल्या अनेक अनुभवांशी असतो. तसाच तो भविष्यातल्या दूरच्या स्वप्नांशी असू शकतो. भूतकाळात रमायलाही तिला आवडते. जीवनातल्या अनेक गोष्टींशी तिचा विविध रूपांचा संबंध असतो. बाह्य संदर्भातील बदल कवितेत येतील किंवा येणारही नाहीत. कवितेचा काळ हा फक्त वर्तमानकाळच नसतो. पण ती वर्तमानविमुख असते असेही नाही. ती लिहिली तर जाते वर्तमान काळातच; पण काळाच्या मापात तिला मोजता येत नाही. आत्मनिष्ठा, आंतरिकता, व्यामिश्रता, बहुअर्थता, लय यांसारख्या काही गुणांमुळे कविता इतर साहित्यप्रकारांपेक्षा खूप वेगळी असते. आपल्या बहुजिनसी सांस्कृतिक परंपरेत ती बहुरूपी आणि बहुसंदर्भीपण असते. अशा बहुवचनी कवितेच्या बदलत्या संदर्भाविषयी काही बोलणे हे तारतम्यानेच घ्यावे लागेल. शिवाय स्वातंत्र्योत्तर काळात तीन-चार पिढ्यांचे कवी कविता लिहिताहेत. नव्या पिढीच्या नव्या संदर्भांची चर्चा आपण करीत असलो तरी पूर्वीच्या पिढ्यांच्या कवींचे कविकर्म काही थांबलेले नसते.

काळ पुढे जात असतो, तेव्हा संदर्भ बदलणे अटळच असते. जसजसा काळ बदलतोय तसतसा तो कवितेला प्रतिकूल होत जातोय. बदलते संदर्भ कवितेला कठीण दिवस आणताहेत. पण विरोधाभास असा की, कविता उदंड लिहिली जात आहे. उणीव नेहमीप्रमाणे रसिकांचीच भासते. बदलत्या संदर्भात प्रश्न हा आहे की, किती व कोणती कविता काळाचे भान ठेवून आहे? साहित्याचे संदर्भ हे नेहमी सांस्कृतिक संदर्भ असतात. ते बदलतात, तेव्हा साहित्य बदलते. कविता बदलते. कवितेचे विषय बदलतात. आशयसूत्रे बदलतात; पण कवितेच्या दृष्टीने कवितेची मूलभूत संरचनाच बदलते, भाषेची मांडणीच बदलते, तेव्हा कवितेचे नवे युग सुरू होते. नुसतेच संदर्भ बदलणे पुरेसे नसते. बदलत्या संदर्भात जुने साचे मोडले जातात. नव्या युगाची आव्हाने स्वीकारण्यासाठी नवी भाषा, नवी रूपे, नवे वाग्विशेष येतात

किंवा जाणीवपूर्वक आणावेही लागतात. बाहेरचे वारे येते आणि देशीपणाचा शोधही त्यांच्या संदर्भात घ्यावा लागतो.

स्वातंत्र्योत्तर काळातील बदलत्या संदर्भांचा विचार करताना हे लक्षात ठेवले पाहिजे की, हा काळ म्हणजे काही एक वेगळे बेट नाही. या कवितेला किमान सातशे वर्षांची परंपरा आहे. संदर्भ बदलले, तरी परंपरेतंले, बरेवाईट पुढे काहीतरी चालूच राहते. परंपरा आणि परिवर्तन यांचाही एक इतिहास असतो. या दोन्हींच्या समन्वयातून कवितेची वाटचाल पाहिली, म्हणजे मग ती नुसती जंत्री वा आढावा होत नाही तर तिला एक मानवी-मूल्य प्राप्त होते. प्रत्येक पिढी पहिल्या पिढीच्या खांद्यावरून पुढे पाहते. त्यामुळे तिला जास्त दिसते. ती क्रमाने पुढे जाते. पण जास्त दिसते, म्हणून जास्त समजते, असे मात्र नसते. पुढे जाण्याच्या प्रक्रियेत प्रतिभावंतांची कामगिरी महत्त्वाची असते. बदलत्या संदर्भाचा सृजनशील उपयोग झाला नाही, तर संबंध पिढीत नाव घेण्यासारखे कुणी निपजणारही नाही कदाचित.

बदलत्या संदर्भाचा विचार करताना स्वातंत्र्योत्तर काळातील कवितेबद्दल जो विचारव्यूह या निबंधात मांडायचा आहे त्याचा आरंभ केशवसुतांच्या कवितेपासून म्हणजे अर्वाचीन मराठी कवितेच्या आरंभापासून होतो. स्वातंत्र्यपूर्व काळातील ही कविता वसाहतकालीन कविता आहे. तिने ब्रिटिश रोमँटिक परंपरेतून प्रेरणा घेतली. आत्मभानासाठी तिला बराच संघर्ष करावा लागला. केशवसुतांच्या कवितेत याचा प्रत्यय येतो. म्हणून त्यांना 'बीजकवी' असे म्हणता येईल. मराठी कविता आत्मनिष्ठ झाली. व्यक्तिस्वातंत्र्याला महत्त्व आले. पुढे रविकिरण मंडळाच्या कवितेत रोमँटिक प्रवृत्ती कृत्रिम रूपात व्यक्त झाल्या. विराट जन-आंदोलनाकडे या कवितेने पाठ फिरवल्यामुळे केशवसुतांच्या रोमँटिसिझमचा सहज आविष्कार करणाऱ्या कुसुमाग्रजांची 'विशाखा' लोकप्रिय झाली. स्वातंत्र्य जरी १९४७ साली मिळाले असले, तरी मराठी कवितेत आधुनिकतेचा प्रवेश १९४०-४५ च्या सुमारासच झालेला होता. त्यामुळे मराठी कवितेच्या विकासक्रमात स्वातंत्र्योत्तर विभागणीला फारसे महत्त्व नाही. संदर्भ आधीच बदलले होते. त्या प्रक्रियेला अधिक गती मिळाली. गांधीवादाला मराठी साहित्याने जसे महत्त्व दिले नाही, तसेच देशाचे स्वातंत्र्य, फाळणी, गांधीवध, निर्वासितांचे प्रश्न यांमुळे बदललेल्या संदर्भाकडेही प्राय: दुर्लक्ष केले. कवितेतही अपवादात्मकच रचना आहेत. 'इतिहासाचे व्यापक भान मराठी साहित्यात नाही' हे प्रा. रा. ग. जाधव यांचे निरीक्षण कवितेच्या संदर्भातही खरेच आहे.

वसाहत काळातच केशवसुतांच्या कवितेपासून मराठी कवितेत जागतिकीकरणाची प्रक्रिया सुरू झालेली होती. वसाहतवादाच्या जोखडातून मुक्त होण्याची धडपड चालू असतानाच पाश्चात्त्य प्रभावांचा स्वीकार करण्यातली अंतर्द्वंद्वे आपल्याला या काळात शोधता येतील.

रोमँटिसिझमकडून आधुनिकतेकडे ही क्रांती मर्ढेकरांनी केली आणि जागतिकीकरणाच्या दिशेने पुढचे पाऊल टाकले. नवकविता आणि त्यातली आधुनिकता याला उत्तर वसाहतकाळाचा प्रभाव असेही म्हणता येईल. जागतिकीकरणाची प्रक्रिया वसाहतकाळ आणि उत्तर वसाहतकाळ











यांच्यामुळेच गतिशील झाली.

१९४३ पासून मर्ढेकरांनी रविकिरणी रोमँटिसिझमचा त्याग करून अचानक नव्या वळणाची कविता लिहायला सुरुवात केली. हा बदल जागतिक परिस्थितीमुळे दुसऱ्या महायुद्धाच्या भीषण स्वरूपामुळे होता तसाच तो पाश्चात्त्य वाङ्मयाच्या अभ्यासामुळेही होता. 'मराठी वाङ्मय पुरेसे परपुष्ट नाही,' अशी त्यांची तक्रार प्रसिद्ध आहे. फक्त इंग्रजी साहित्यावर अवलंबून राहणे पुरेसे नाही हे त्यांच्या लक्षात आलेले होते. मराठी साहित्यात कल्पनात्मक आवर्तता येत आहे. त्यातून बाहेर पडण्यासाठी एखादी युरोपियन भाषा अवगत करून घ्यावयास हवी असा त्यांचा आग्रह होता. पिरांदेल्लो या नाटककारावर त्यांनी लेख लिहिला. युद्धकालीन अभंग लिहून मर्ढेकर वास्तवसन्मुख झाले असे नाही तर त्यांनी मराठी कवितेला विश्वसन्मुखही केले. पाश्चात्त्य आधुनिकतावादाचा आणि विज्ञानयुगाचा प्रभाव घेऊन लिहिली जाणारी मर्ढेकरांची कविता जागतिक संदर्भाला सामोरी जाते. 'केशवसुतांपासून पुढच्या आधुनिक मराठी काव्यामध्ये विश्वव्यवस्थेचा संदर्भ मर्ढेकरांच्या कवितेलाच लाभलेला दिसतो. मर्ढेकर विश्वाच्या संदर्भात व्यक्तीकडे पाहतात, तेव्हा मानव खुजा, नगण्य दिसू लागतो... मराठी कवितेला स्वप्नाळुपणातून बाहेर काढलेच; परंतु त्याबरोबरच ती वास्तवसन्मुख बनवून वास्तवाची एक नवी अर्थपूर्णता त्यांनी मराठी कवितेला दिली,' असे रसाळांनी म्हटले आहे. 'मर्ढेकर नवकवितेचे प्रणेते आहेत,' असेही म्हटले. गंगाधर गाडगीळांनी त्यांना 'दुसरे केशवसुत' म्हटले. जागतिकीकरणाच्या संदर्भात त्यांना मराठीतला पहिला जागतिक जाणिवांचा कवी म्हणता येईल. 'जागतिक आधुनिकतेचा कवितेत साक्षात्कार घडवणारा पहिला मराठी कवी.'

मर्ढेकरांनी समांतर असा मार्क्सवाद आणि रशियन राज्यक्रांती यातून प्रेरणा घेत, दुसरा अक्ष शरच्चन्द्र मुक्तिबोध यांनी मराठी कवितेत मांडत; मराठी कवितेत जागतिक विचारप्रणाली आणून सोडली. तसा मार्क्सवादी विचारप्रणालीचा प्रभाव मराठी कवितेत तिसऱ्या दशकातच पडलेला होता; पण तो अगदीच प्राथमिक आणि वरवरचा होता. त्याचे खरे रूप मुक्तिबोधांच्या कवितेत साकारले. मानवी मर्यादेचा शोकात्म क्षण मर्ढेकरांच्या कवितेत, तर मानवी सामर्थ्याच्या जाणिवेचा सूर्योदयी क्षण मुक्तिबोधांच्या कवितेत प्रत्ययास येतो. आर्थिक-सामाजिक विषमता आणि त्यातून होणारे अन्याय यांचे प्रश्न व्याकुळ मानवतेतून सुटणारे नाहीत. त्यासाठी क्रांतीच हवी. मुक्तिबोधांनी वास्तववादाचे वेगळे आणि खरे रूप दाखवले.

मर्ढेकर आणि मुक्तिबोध दोघांनीही मराठी कवितेला जागतिक बदलाच्या संदर्भाशी नेऊन भिडवले. करंदीकर सुरुवातीला स्वेदगंगेच्या प्रवाहात होते. नंतर विज्ञानवादी, वास्तववादी व प्रयोगशील होत एम्पसनच्या काव्यसंदिग्धतेच्या जवळ गेले. मनमोहनांनी काहीशी संज्ञाप्रवाही कविता लिहिली. सदानंद रेगे यांनी एकीकडे रशियन मायरोवस्की व दुसरीकडे अमेरिकन वाल्ट व्हिटमनच्या कवितांचे अनुवाद करीत, अतिवास्तववादाच्या विलक्षण कल्पकतापूर्ण कविता केल्या. बाकीचे महत्त्वाचे कवी इंदिरा संत, पु. शि. रेगे, ना. घ. देशपांडे, बोरकर, अनिल हे बदलत्या संदर्भांची दखल न घेता रोमँटिक कवितेची नवी-जुनी रूपे शोधत



अनुक्रमणिका







राहिले. कुसुमाग्रज बदलत्या संदर्भाप्रमाणे लिहीत राहिले.

नवकवितेचा दुसरा टप्पा पुन्हा रविकिरणमंडळाची आवृत्ती असावा, असा सामाजिक संबंधापासून दूर व्यक्तिवादी, क्षणवादी, प्रतीकवादी, प्रतिमावादी; पण समग्रत: रोगट रोमँटिक असा होता. जागतिकीकरणाची प्रक्रिया पुढे न्यायला याचा काहीच उपयोग नव्हता. दुर्बोधता हेच काव्याचे लक्षण ठरावे, अशा परंपरेपासून तुटलेल्या या कवितेत धड देशी जाणिवाही नव्हत्या. नव्या प्रतिमा वापरणाऱ्या सौंदर्यवादी नवकवींना आधुनिकतेचा वाराही लागलेला नव्हता.

साठोत्तर काळ हा बदलत्या संदर्भाच्या दृष्टीने विशेष महत्त्वाचा ठरतो, याचा प्रारंभ अनियतकालिकांच्या चळवळीने झाला, यातून प्रस्थापित साहित्यव्यवस्था, मूल्ये, अभिरुची, भाषा यांना हादरे बसले. स्थितिशील रूढ कवितेची बंधने झुगारून देऊन समकालसन्मुख अशी क्रांतिकारक स्थित्यंतरे घडवून आणणारी गतिशील कविता अनेक रूपांत पुढे आली. सत्यकथा संस्कृतीच्या कलावादी, रूपवादी चौकटीतून बाहेर पडत कवितेचे क्षेत्र वाढवले, तसेच आपल्या परंपरेची पाळेमुळेही शोधली. भाषेचे नवे प्रयोग करीत कवितेने जगण्याशी नाते जोडले. आपले स्वत्व, अस्मिता व देशीयता यांचा शोध घेतला.

१९६० सालीच संयुक्त महाराष्ट्राची स्थापना झाली. या बदलाचा कवितेशी काही संबंध होता का? या चळवळीने जे नवप्रवर्तन केले त्यामागे संयुक्त महाराष्ट्र निर्मितीच्या प्रेरणा किती, याचे उत्तर देताना डॉ. भा. ल. भोळे म्हणतात की, 'संयुक्त महाराष्ट्राची मागणी करणाऱ्यांत साठोत्तर कवी कमीच होते. गोवा आंदोलनाविषयी हेच म्हणता येईल. साठोत्तर पिढी या आंदोलनाशी समरस झाली नाही. कारण साठोत्तर पिढीच्या प्रेरणा मराठी राज्याशी निगडित नव्हत्या. लघुनियतकालिकांची मूळ गंगोत्री पाश्चात्त्यच होती. यांच्या प्रेरणा देशीयतेचा आग्रह मान्य करूनही युरोपातील विद्यार्थी चळवळींच्या होत्या. सर्व जगभरच तरुणांचा उठाव झालेला होता. जगात नवीन वैचारिक प्रणाली जन्माला आलेल्या होत्या. वंशवादविरोधी लढे चालू होते. या साठोत्तर पिढीच्या कवींनी समप्रवृत्तीच्या भारतीय भाषांतल्या कवितांचे अनुवाद केले, तसेच पाश्चात्त्य कवितांचेही भरपूर अनुवाद केले. मर्ढेकरांचे म्हणणे ऐकले. जागतिक संदर्भाशी जोडले गेले नसते, तर त्यांचे सामर्थ्य कदाचित जन्मलेच नसते. त्यांनी केवळ ब्राह्मणी वर्तूळच भेदले असे नाही, तर संकुचित राज्य, राष्ट्रवर्तूळही भेदले. सामाजिक भानाबरोबरच मानवी जीवनाच्या अस्तित्वाचा अर्थही शोधला. या पिढीचा संसदीय राजकारणावर विश्वास नव्हता. स्वातंत्र्यानंतर येणाऱ्या सुराज्याच्या स्वप्नाचा भंग झाल्याने त्यांचा भ्रमनिरास झालेला होता. आवां गार्द पिढीने युरोपात जे केले त्याच्याशी समांतर काम या पिढीने मराठी कवितेच्या क्षेत्रात केले.'

स्वातंत्र्योत्तर काळात महानगरांची भरमसाट वाढ झाली. हा जागतिकीकरणाच्या प्रक्रियेचाच परिणाम होता. साठोत्तर कवितेचा बराच मोठा अंश महानगरी संवेदनेने व्यापलेला आहे. कारण या अनुभवातूनच त्यांची मानवी अस्तित्वाची चिंता जन्म घेते. जगाची व जगण्याची

चिंता, संवादहीनता, नगण्यता, तुटलेपणा किंवा परात्मभाव, अश्रद्धा यातून एक अराजकी कविता निर्माण झाली. अरुण कोलटकर, दिलीप चित्रे, डहाके, इत्यादींनी जागतिक संदर्भाचे भान बाळगले होते. नेमाडे यांनी देशीयतेवर जोर दिला तो वस्तुत: वसाहतवादाच्या विरोधासाठी. जागतिकीकरणाच्या प्रक्रियेला विरोध करण्यासाठी देशीयता किंवा निर्वसाहतीकरण कितपत उपयोगी पडेल, हा प्रश्न वेगळा; पण ही एक संवेदना जागी करणे महत्त्वाचेच होते. जागतिकीकरण हे नववसाहतीकरण होऊ नये यासाठी हा अंकुश होय.

नारायण सुर्वे यांच्या १९६२ मध्ये प्रकाशित झालेल्या 'ऐसा गा मी ब्रह्म' या संग्रहाने मराठी कवितेची समाजसन्मुखता एका नव्या अस्सल रूपात पुढे आली. सुर्वे मार्क्सवादी असले तरी त्यांची कविता पोथीतून नव्हे तर जीवनानुभवातून आलेली होती. श्रमिक, शोषितांबद्दल सहानुभूतीने लिहिल्या जाणाऱ्या मध्यमवर्गीय कवींच्या कवितेपेक्षा वेगळी, शोषितांचे जग प्रथमच मराठी कवितेत आणणारी ही कविता तत्त्वत: जागतिक होती. जगातल्या कामगारांशी नाते जोडणारी होती. आशावादी होती. सामाजिक बांधीलकी मानणारी होती. समाजपरिवर्तनाच्या लढ्याशी नाते सांगणारी होती, पण आक्रस्ताळी नव्हती. तिच्या भाषेत, मांडणीत उत्कटता होती.

लघुनियतकालिकाच्या चळवळीत सुरुवातीला सगळेच होते. अस्तित्ववादी, देशीवादी, मार्क्सवादी, दलित वगैरे. पण पुढे वेगळे होणे अटळच होते. सुर्वे दलितांपासून वेगळे मानले गेले. प्रकाश जाधवने दलित जाणीव साम्यवादाशी जोडून पाहत कलात्मक भानही महत्त्वाचे मानले. नामदेव ढसाळ, यशवंत मनोहरांनीही काही काळ मार्क्सशी संगतसोबत केली, पण पुढे आंबेडकरवादी झाले.

दलित चळवळीने अमेरिकन, आफ्रिकन निग्रोंच्या वंशवादविरोधी चळवळींपासून प्रेरणा घेत आपल्या चळवळीला जागतिक परिमिती दिली. पण मुख्य प्रेरणा अर्थातच डॉ. आंबेडकरांची होती. राजा ढाले, नामदेव ढसाळ यांनी लघुनियतकालिकातल्या साहित्यिक विद्रोहापासून बळ घेऊन मोठ्या चळवळी केल्या. दलित कवितेने विद्रोहनिषेध मूल्यांची मोडतोड, मुक्त भाषा, यातून शब्दस्फोट घडवून आणले. आर्थिक विषमतेपेक्षा सामाजिक-सांस्कृतिक विषमतेविरुद्ध आवाज उठवला. साहित्याचा शस्त्र म्हणूनही उपयोग केला. हे सर्व अभूतपूर्व होते. भारतीय भाषांना यापासून प्रेरणा मिळाली. जगभर हे साहित्य पोहोचले.

पुढे दलित कवितेत तोच-तोपणा, सांकेतिकता, थांबलेपणा, एकसुरीपणा आला; आणि ती वाङ्मयीन सांस्कृतिक कर्मकांडात अडकून पडली, तेव्हा 'दलित साहित्याने वैश्विक साहित्याच्या किती पातळ्या गाठल्या, याचा ऊहापोह होणे गरजेचे आहे,' असे नामदेव ढसाळांनी ठणकावून सांगितले. संपूर्ण मराठी कवितेबद्दलही असा ऊहापोह होणे खरेतर गरजेचे आहे.

साठोत्तर कवींत रानातले कवी ना. धों. महानोर असूनही ग्रामीण कवितेचा प्रवाह मात्र क्षीणच राहिला. कृषिसंस्कृती आणि शेतकऱ्यांच्या चळवळी तसेच तुकाराम, महात्मा फुले,

बहिणाबाई अशी परंपरा असूनही बदलत्या संदर्भात ग्रामीण कवितेला मोठा कवी मिळाला नाही. शिवाय या कवितेला सैद्धांतिक आधार कुठलाच नव्हता. परिवर्तनाच्या प्रेरणाही जवळपास नाहीतच. जागतिकीकरणामुळे शेतकरी आत्महत्या करताहेत. कविता त्यांच्याशी भिडत नाही.

१९७५-८० च्या सुमारास पुन्हा संदर्भ बदलले. आणीबाणी येऊन गेली. नक्षलवादाच्या चळवळी वाढल्या. मराठी कवितेत काही फरक पडला नाही. 'साठोत्तर काळात चार बंडे मराठी कविताक्षेत्रात झाली' असे वसंत पाटणकरांनी म्हटले आहे. लघुनियतकालिकांचे बंड, सुर्वे यांच्या कवितेचे वंड आणि दलित कवितेचे बंड अशी तीन बंडे ७५ पूर्वीच होऊन थंड झाली. अरुण कोलटकर, दिलीप चित्रे, डहाके, विलास सारंग यांची कविता जागतिक पातळी गाठण्याची धडपड पूर्वीप्रमाणेच करीत राहिली. सुर्वे यांच्या क्षमता संपून कुशलता आलेली होती. दलित कवितेत नामदेव ढसाळांपुढे बाकी जवळपास निस्तेज झालेले. या कालखंडात कविता उताराला लागलेली किंवा साठोत्तरीचाच विस्तार करीत असलेली दिसते. बंडे जेव्हा जोरात होती, तेव्हाही ती केवळ देशीपणाच्या जाणिवेवर होत नव्हती, तर त्या जोडीला आंतरराष्ट्रीय वा जागतिक घटना, विचार, साहित्य यांपासून प्रेरणा व पाठबळ घेत होती. जागतिकीकरणाची सकारात्मक प्रक्रिया कवितेने स्वीकारलेली होती.

चौथे बंड हे स्त्री- कवितेचे. बदलत्या संदर्भात स्त्रीकविता प्राय: रूढिबद्ध, रोमँटिक, पारंपरिक राहिलेली आहे. दलित कवयित्री लिहू लागल्या आहेत. स्त्रिया आधुनिक होत आहेत आणि स्त्री-मुक्तीच्या प्रश्नांना वाचाही फुटू लागली आहे. या काळात प्रभा गणोरकर, अनुराधा पाटील, मल्लिका अमर शेख वगैरे वेगळेपणाने लिहीत आहेत; पण स्त्रीकविता ही स्त्रीवादी कविता झाल्याशिवाय तिला सक्षमता येणार नाही आणि त्यासाठी जागतिक स्त्रीवादी विचारप्रणाली व चळवळी यांच्याशी जोडले जाणे आवश्यक आहे. बहिणाबाईंचा आधार पुरेसा ठरणार नाही.

एकूण सर्वच आधुनिक व समकालीन कवितेला जागतिक संदर्भ अटळ आहे. परंपरेचे भान नसलेले आणि समग्रतेची जाणीव नसलेले 'सुभेदारी पर्व' हे सामाजिक, सांस्कृतिक आंदोलनाचे अपत्य असल्याचे रा. ग. जाधव यांनी म्हटले आहे. विकेंद्रीकरणातून विघटनवाद आल्याचा त्यांचा अनुभव आहे.

नव्वदोत्तरी पिढीपुढचे अर्थात चौथ्या नवतेचे प्रश्न श्रीधर तिळवे यांनी मांडले आहेत, त्यात बरेच तथ्य आहे. १९८० नंतरच्या साहित्याला चेहराच उरलेला नाही; आणि एक प्रकारचा विस्कळीतपणा आलेला आहे. चेहरा गमावलेला आहे तो अनेक चेहऱ्यांच्या भाऊगर्दीमुळे. जागतिकीकरणाचे भान येऊ लागले आहे. अनुभवविश्वात चिह्नसृष्टीचा नवा घटक सर्व अन्य घटकांवर प्रचंड प्रभाव टाकत आहे. त्यामुळे अनुभवविश्व वैश्विक होत आहे. अनुभवविश्वाचे जागतिकीकरण समजून घेतल्याशिवाय समकालीन अनुभवविश्वाची निर्मिती करणे अशक्य आहे, अशी जाणीव शेवटच्या दशकातल्या किती कवींना आहे? उलट



अनुक्रमणिका







जागतिकीकरणाच्या संदर्भात प्रसारमाध्यमांची जी दादागिरी चालू आहे, त्याचा कविताक्षेत्रावर विपरीत परिणाम होताना दिसतो. कोणते कवी/कविता विकले जाऊ शकतात? कविता सादरीकरणाचे मार्केटिंग कसे करता येईल? रसिक हा उपभोक्ता व कविता ही 'कमोडिटी' झाली आहे. विचारप्रणालीपेक्षा रोल मॉडेल/आयडॉल महत्त्वाचे. यश, साफल्य व्यापारी हिशेबाने मोजले जाते. कविसंमेलने मनोरंजक कशी होतील? उत्सवी कविसंमेलनांनी कवितेच्या रूपात बदल केले. धक्कातंत्र, चमत्कृती, भावुकता, दाद मिळवायच्या जागा, माध्यम सर्वंकष झाले आहे. शब्दापेक्षा दृक्प्रतिमेला महत्त्व आले आहे. या तंत्राचा काव्यानुकूल परिणाम घडवणारा अरुण कोलटकर एखादाच. माध्यमांनी वाङ्मयीन संस्कृतीचा संकोच केलाय. कविता माध्यमांच्या गरजा पुरवण्यासाठीच लिहिल्या जातील का? यातून निम्नतम अभिरुचीचेच समाराधन होते. हा संदर्भबदल भीषण आहे. कविता म्हणजे काय, कवी कसा दिसावा, त्याने कविता कशी म्हणावी, हे सर्व प्रसारमाध्यमेच ठरवतील. स्वातंत्र्योत्तर मराठी साहित्याचे बदलते संदर्भ कोणते, हे सुद्धा संपर्कमाध्यमेच निश्चित करतील आणि श्रेष्ठकवी निवडतील. त्याआधी नव्या पिढीने सावध व्हायला हवे. "संपर्क माध्यमाला दुय्यम लेखून आज प्रथम दर्जाची कलानिर्मिती करता येणे शक्य आहे असे वाटत नाही" असा इशारा डॉ. म. सु. पाटील यांनी दिला आहे. अनंत काणेकरांची महत्त्वाची कविता स्वातंत्र्यपूर्व काळातच लिहिली गेली, पण ते १९८० पर्यंत हयात होते. ५० नंतर त्यांनी कवितालेखन जवळपास थांबवले होते. काणेकर मराठीतल्या मार्क्सवादी कवितेचे अग्रदूत होते. मराठी कवितेत आंतरराष्ट्रीय विचारधारा त्यांनी मनापासून आणली होती.

महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या या शताब्दी वर्षाच्या एक वर्ष आधी एका थोर जागतिक महाकवीचीही जन्मशताब्दी साजरी झाली. तो कवी म्हणजे पाब्लो नेरुदा. अनंत काणेकर नेरुदाएवढे मोठे नव्हते, तरी दोघांच्या कवितेतली काही आशयसूत्रे समान आढळतात हेही काही कमी नाही. काणेकरांनी कदाचित नेरुदा वाचलाही नसावा. नेरुदाच्या कवितांचा पहिला अनुवाद दिलीप चित्रे यांनी १९६६ मध्ये केला होता. महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या शताब्दीच्या निमित्ताने या दोन कवींत दूरान्वयाने का होईना, नाते जोडता आले याचा आनंद वाटतो. प्रत्येक नव्या युगाचा अनुभव हा दरवेळी नव्या आविष्काराची, नव्या कबुलीजबाबाची मागणी करतो आणि हे जग नेहमीच नव्या कवीच्या प्रतीक्षेत असते, असे कुणीसे म्हटले आहे. बदलत्या संदर्भाचा अभ्यास करताना नेरुदाचे एक विधान आपल्याला कायम लक्षात ठेवायला हवे. त्याने म्हटलेय, 'जो कोणी कवी वास्तववादी नाही, तो गेल्यातच जमा आहे आणि जो कवी केवळ वास्तववादी आहे त्याची देखील मेलेल्यातच गणना करावी लागेल.'

**निशिकांत ठकार**

सुरसंगत ४७ राघवद्रनगर, मुरारजी पेठ, सोलापूर ४१३००१

फोन नं. ९५/२१७/२६२८१५९.

❑



अनुक्रमणिका







# स्वातंत्र्योत्तर काळातील मराठी साहित्याचे बदलते संदर्भ : नाटक



**श्रीनिवास भणगे**

'नाटक' या साहित्यप्रकारासंबंधी काही विवेचन करण्यापूर्वी, एक गोष्ट स्पष्ट करणं हे मी माझं कर्तव्य समजतो. मी नाट्यशास्त्राचा प्राध्यापक किंवा 'समीक्षक-अभ्यासक' नाही. गेली बरीच वर्षं नाटकाच्या क्षेत्रात मी नाटककार, दिग्दर्शक, नट आणि पडद्यामागचा कलाकार-तंत्रज्ञ म्हणून प्रत्यक्ष काम केलेलं आहे आणि अद्याप करतो आहे. म्हणजे मी नाट्यवाङ्मयाचा 'कामगार-अभ्यासक' आहे, असं म्हणायला काहीही हरकत नाही. मध्यंतरी कुणीतरी 'नाट्य-चिंतक' असा शब्द वापरला होता. तसा मी आहे. त्यामुळे प्रकांड पंडितांची परिभाषा कदाचित मला येणार नाही. पण नाटकातला किडा असल्यामुळे, मला, सदासर्वकाळच्या नाटकांबद्दल आणि 'नाटक्यांबद्दल' एक प्रकारची सह-अनुभूती आहे. (ज्याला इंग्रजीमध्ये Empathy असा चपखल शब्द आहे.) म्हणून सुरुवातीलाच नम्रपणे सुचवू इच्छितो की, या माझ्या मर्यादा आहेत.... (आणि कदाचित सामर्थ्यही!) असो.

'साहित्याचे बदलते संदर्भ' या विषयात आपण नाटकाचा समावेश केलेला असला, तरीही निव्वळ नाटकाची संहिता ही परिपूर्ण कलाकृती आहे, असं मला वाटत नाही! स्टार्क यंग नाट्यसंहितेला 'Impure art' म्हणतो. मी त्याच्याशी सहमत आहे. कारण नाटककार हा कवी किंवा कथा-कादंबरीकार यांच्यासारखा एकांडा लेखक नाही. तो जरा वेगळ्या प्रकारचा लेखक आहे. श्रेष्ठ किंवा कनिष्ठ नाही, पण वेगळा.

एखादं नाटक आपल्याला आवडतं त्यावेळी नेमकं काय घडलेलं असतं? तर आपल्याला एक 'नाट्यानुभव' आलेला असतो. हा जो नाट्यानुभव आहे, तो अन्य कुठे किंवा माझ्या अभ्यासिकेत मला मिळणार नाही का? तर नाही! कारण हा अनुभव इतर अनुभवांपेक्षा व्यामिश्र स्वरूपाचा आहे. त्याला 'सत्याभास' असं म्हटलेलं आहे. एखाद्या उदाहरणानं हे नीट लक्षात येईल.

अशी कल्पना करा की, आपल्या शेजारी एक कुटुंब राहतं आहे. चांगला सुशिक्षित माणूस आहे, पण दारूच्या आहारी गेला आहे. रोज सकाळी उठल्यापासून त्याचे राडे चालू होतात. सतत धुंदीत आणि अखंड बडबड! दारूच्या नशेत त्यानं आपल्या बायकोला बडवायला सुरुवात केली तर? चिक्कार दारू पिऊन त्यानं स्वत:चं पोरच मारून टाकलं



अनुक्रमणिका








तर? काठी मारून बायकोचाही खून केला तर? ...आपली प्रतिक्रिया काय असेल? आपल्याला ते असह्य होईल. आपण आधी जाऊन त्याला बडवून काढू आणि पोलिसाच्या ताब्यात देऊ! ...पण एक लक्षात घ्या... 'एकच प्याला' पाहताना आपण यातलं काहीही करणार नाही! उलट 'वा: वा:! काय अभिनय आहे!' 'काय गडकऱ्यांची शब्दसंपदा आहे' अशी दाद देतो!

इंग्रजीमध्ये या मन:स्थितीचं वर्णन करताना त्यांनी, "Willful suspension of disbelief" असा वाक्यप्रयोग केला आहे. रंगमंचावर मरणारा माणूस खरा मरत नाही, हे पूर्णपणे माहिती असतानाही, त्याचं मरणं खरं मानण्याच्या संशयाचा फायदा आम्ही नाटकाला बहाल केला आहे. कारण ते सत्य नाही, तर 'सत्याभास' आहे आणि यालाच 'नाट्यानुभव' म्हणतात.

विषय सोडून, एवढं सगळं विवेचन मी यासाठी केलं की एक रंगकर्मी म्हणून मला असं सुचवायचं आहे की नाटकाच्या आस्वादकानं, मग तो वाचक असेल किंवा प्रेक्षक, मनोमन एक खूणगाठ बांधावी की रंगभूमीच्या ज्या काही अंगभूत मर्यादा आहेत (काही सुविधाही आहेत) आणि बरचसं तंत्र आहे त्यांचं भान आणि दुसऱ्या बाजूला आपल्या नाटकातल्या व्यक्तिरेखांच्या मांडणीचं, विषय फुलवीत आशय आपल्या मनापर्यंत पोहोचवण्याचं भान, अशी दोन्ही व्यवधानं सांभाळीत नाट्यलेखनाची सर्कस नाटककारानं साध्य केलेली आहे. तेव्हा त्याचा आस्वाद घेताना आपणही, केवळ तांत्रिक सफाईनं केलेल्या व्यावसायिक चमत्कारानं डोळे दिपवून घ्यायचं काही कारण नाही आणि तंत्राचा अजिबात विचार न करता, केवळ शब्दांचे पोकळ फुलोरे फुलवले की त्या नाटकाला साहित्यिक थोरवी बहाल करण्याचंही कारण नाही. एक गोष्ट मात्र निश्चित आहे, नाटकातली वाङ्मयीन गुणवत्ता जोपासताना, नाट्यतंत्राकडे थोडं दुर्लक्ष झालं तरी ते नाटक श्रेष्ठच ठरेल. हा फरक 'चांगलं नाटक' आणि 'थोर नाटक' ('Good-play' आणि 'Great-play') मधला आहे. तंत्रचातुर्य आणि कारागिरी हा रंगतदार नाटकाचा प्राण असतो, हे खरं. पण प्रतिभेच्या उन्मेषात एखादेवेळी नाटक ओबडधोबड होऊन गेलं तरी हरकत नसते. कारण जे गमावलं त्याच्यापेक्षा जे कमावलं ते अनमोल असतं! 'एकच प्याला' आणि 'नटसम्राट' या दोन नाटकांत नाट्यकलेच्या दृष्टीनं असंख्य दोष दाखवता येतील. पण तरीही ती दोन्ही नाटकं 'थोर' आहेत.

मूलत: मराठी नाटकाचा स्वभाव कसा आहे? त्यात स्वातंत्र्यप्राप्तीनंतर काही बदल झाले का? आणि झाले असल्यास स्वातंत्र्यप्राप्ती हे त्याचं कारण आहे का? सामाजिक स्थित्यंतराची प्रतिबिंबं मराठी नाटकात पडली का? आणि मुळात ती पडलीच पाहिजेत का? असे काही मूलभूत प्रश्न आहेत. त्यांची उत्तरं शोधण्यासाठी स्वातंत्र्यप्राप्तीच्या आसपास मराठी नाटकांची परिस्थिती काय होती, याचा थोडक्यात आढावा घेतला पाहिजे. अर्थात, या किंवा पुढीलही काळातल्या सर्व नाट्यकृतींची आणि सर्वच नाटककारांची समग्र चर्चा अपेक्षित नाही. काही महत्त्वाचे नाटककार आणि त्यांची उल्लेखनीय नाटकं, यांचा आढावा

घेतला तरी अंदाज लावता येईल.

तर १९४० ते ५० हे दशक नेमकं मराठी रंगभूमीच्या दृष्टीनं संक्रमणाचं होतं. या दशकात रंगभूमीच्या संदर्भात बऱ्याच घडामोडी झाल्या. पण त्याचबरोबर साहित्यप्रकार म्हणून नाट्यसाहित्यात काय घडलं हे पाहणं मनोरंजक ठरेल. (त्या त्या कालखंडात प्रकाशित झालेल्या नाट्यसंहितांच्या आधारे हा आढावा घेतला आहे. प्रयोगांचा इतिहास केवळ संदर्भासाठी वापरला आहे, याची कृपया नोंद घ्यावी.)

या दशकात श्री. मो. ग. रांगणेकरांची सर्वांत जास्त म्हणजे नऊ नाटकं प्रकाशित झाली. त्या खालोखाल वि. वा. शिरवाडकर आणि भा. वि. वरेरकर यांची तीन-तीन ....आचार्य अत्रे, अनंत काणेकर आणि ना. सी. फडके यांची प्रत्येकी दोन आणि पु. भा. भावे, पु. ल. देशपांडे, अ. वा. वर्टी, वि. वि. बोकील, नागेश जोशी, बाबूराव गोखले, माधवराव जोशी, अच्युत बळवंत कोल्हटकर आणि नाना जोग यांची प्रत्येकी एक.

या दशकातलं मराठी नाटक हे केवळ व्यवसायासाठीच लिहिलं गेलं आहे, हे आपण लक्षात ठेवलं पाहिजे. त्यावेळी लिहिल्या गेलेल्या नाटकाला हौशी, समांतर, स्पर्धा असा कुठलाही रंगमंच उपलब्ध नव्हता. त्यामुळे त्यात आशय वा विषयाचं नावीन्य, साहित्यमूल्यांचा पाठपुरावा, 'फॉर्म' या अर्थी नव्या मांडणीचा शोध... असे काही प्रयत्न जाणीवपूर्वक केल्याचं दिसत नाही. इब्सेनप्रणीत 'एक अंक-एक प्रवेश' आणि तीन अंकाचं सुटसुटीत नाटक, हा फॉर्म या काळात रुजला हे खरं, पण तो प्रयोगतंत्राचा एक भाग झाला. नाटकाच्या साहित्यमूल्याचा आणि त्याचा नजीकचा संबंध नव्हता आणि ही शैली देखील, नाट्यमन्वंतरच्या काळात, म्हणजे या दशकाच्या आधीच स्वीकारली गेली होती.

वास्तविक या दशकापूर्वीच, श्रीपाद कृष्ण कोल्हटकरांनी काल्पनिक कथानकांना आपल्या सौंदर्यदृष्टीची जोड देऊन, मराठी नाटकांचं वाङ्मयीन उन्नयन करून ठेवलं होतं. खाडिलकरांनी राजकीय, सामाजिक आणि वैयक्तिक ध्येयवादाची उदात्त चित्रं रंगविली होती आणि तरीही नाटकाची रसवत्ता कशी टिकवायची याचे आदर्श उभे केले होते. कणा असलेली, जिवंत व्यक्तिरेखा तयार करण्यात (Character building) खाडिलकरांचा हात कुणी धरला नसता. आपल्या गुरूंच्या, म्हणजे कोल्हटकरांच्या, कल्पनारम्यतेला आपल्या भावनात्मकतेची जोड देत गडकऱ्यांनी शब्दांचे इमले उभे केले होते. १९२० नंतर उतरती कळा लागलेल्या मराठी रंगभूमीला आपल्या प्रतिभेच्या जोरावर सावरून धरलं होतं, ते मामा वरेरकरांनी. समाजापुढे नवनवे प्रश्न उभे राहत होते.... अहिंसावाद, असहकारिता, सत्याग्रह, मजूर चळवळ, पतितपरिवर्तन, स्त्रीस्वातंत्र्य, अस्पृश्यता निवारण, अशा अनेक प्रश्नांचं स्वरूप नाट्यवाङ्मयातून व्यक्त करणं कठीण काम होतं. पण 'प्रचारकी' असा शिक्का बसण्याची शक्यता स्वीकारूनही वरेरकरांनी ते नेटानं चालवलं होतं. मूळ पौराणिक कथेचा अगदी नव्यानं विचार करून सामाजिक विचार मांडणारं विश्राम बेडेकरांचं 'ब्रह्मकुमारी' हे ओजस्वी नाटक मराठी रंगभूमीचीच निर्मिती होती. पौराणिककथेवर एक कूटनाट्य (Problem-play) कसा निर्माण करता येतो,

याचा वस्तुपाठच बेडेकरांनी निर्माण करून ठेवला होता. विनायक दामोदर सावरकरांनी वीररसाचा वापर करून तेजस्वी नाटकाची परंपरा निर्माण करण्याचा प्रयत्न केला होता. त्यांच्या नाटकातून नाट्यगुणांचा फारसा आढळ होत नसल्याने, ती सतत समोर राहिली नाही इतकंच. देशातल्या राजकीय प्रवाहाविषयी नाटकातून मांडायचं म्हणजे किती मांडायचं? शंकर मोरो रानडे नावाच्या नाटककारानं, लॉर्ड रिपननं स्थानिक स्वराज्याचे जे हक्क जनतेला दिले, त्यावर 'अधिकारदान विवेचना' ऊर्फ 'स्थानिक स्वराज्याविषयी वाटाघाट' हे नाटकच लिहिलं होतं. त्याचवेळी गोऱ्या लोकांचा न्याय करण्याविषयी 'इल्बर्ट बिल' म्हणून बिल येऊ घातलं होतं. त्याविषयी 'गौर-न्याय मीमांसा ऊर्फ ज्युरिसडिक्शन बिल' या नावाचंच एक नाटक रचलं होतं. हे जरा अतीच होतं, हे मला मान्य आहे; पण मला एवढंच प्रतिपादन करायचं आहे की इतकी सगळी परंपरा मागे होती. पण स्वातंत्र्यप्राप्तीच्या दशकातल्या नाटककारांवर त्याचा फारसा परिणाम राहिला नव्हता!

१९४० ते ५० या दशकातलं नाटक, केवळ व्यावसायिकच होतं आणि कदाचित त्यामुळेच, फक्त व्यवसायाभिमुख होतं, असं दिसतं. हा व्यावसायिक दृष्टिकोन वाढविण्यात श्री. मो. ग. रांगणेकर यांचा मोठा वाटा होता, असं म्हणावसं वाटतं. त्यांची 'एक होता म्हातारा', 'कन्यादान' यांसारखी अनेक नाटकं लोकप्रिय झाली. लोकप्रियतेची कमाल मर्यादा गाठली ती त्यांच्या 'कुलवधू' या नाटकानं! खोचक परंतु फारसा न झोंबणारा विनोद, सुटसुटीत, खटकेबाज संवाद आणि कथानकाची गती सांभाळत ठेवलेली रंजकता हे रांगणेकरांचं वैशिष्ट्य म्हणता येईल. या गुणांमुळे नाट्यप्रयोग रंगत असेलही; पण नाटकाची साहित्यिक मूल्यं किती वाढतात, या बाबत शंकेला निश्चित जागा आहे. 'कुलवधू' हे नाटक आत्ता वाचल्यानंतर मला असं वाटलं की, या लोकप्रियतेत नाट्यसंहितेतल्या साहित्यगुणांपेक्षा, दिग्दर्शनातला चटपटीतपणा, इब्सेनप्रणीत नाट्यतंत्राचा लिखाणातला वापर, नव्यानं वापरण्यात आलेला फ्लॅटचा रंगमंच आणि श्रीमती ज्योत्स्ना भोळे यांची लोकप्रियता, त्यांची गोड गाणी, यांचा वाटा जास्त असावा. नाटकाची गुणवत्ता आणि त्याचं रंगभूमीवरचं यश यांचा पुष्कळवेळा काही कार्यकारणसंबंध नसतो, हे मराठीचं नव्हे तर जागतिक रंगभूमीच्या इतिहासात अनेक वेळा सिद्ध झालेलं आहे.... मग या नाटकांच्या प्रयोगाला येणारे प्रेक्षक हे, आपण सुरुवातीला चर्चा केली त्याप्रमाणे, नाट्यानुभव घ्यायला येत होते का? की ज्योत्स्नाबाईंचं भावगीतासारखं श्रुतिमधुर गाणं ऐकायला येत होते? रांगणेकरांच्या नाट्यतंत्रावरच्या हुकमतीविषयी शंकाच नाही. प्रतिभेच्या उन्मेषात नाट्यतंत्राकडे दुर्लक्ष होऊन नाट्यकृती ओबडधोबड झाली तरी ती श्रेष्ठच ठरते हे आपण पाहिलं. पण तंत्राच्या आवेशात, आशयातच पोकळपणा आला तर?

या दशकात नागेश जोशींचं 'देवमाणूस' नावाचं नाटक कमालीचं लोकप्रिय झालं. हाडामांसाच्या सामान्य माणसापेक्षा, अशी ही 'देवमाणसं' मराठी रंगभूमीवर कायम लोकप्रिय होत आलेली आहेत. मराठी प्रेक्षकांनी या पद्धतीच्या 'मेलोड्रामा' ना प्रचंड गर्दी करून काही

नाटककारांना विनाकारण मोठं करून ठेवलेलं आहे. सदासर्वकाळात निर्माण होणाऱ्या या पद्धतीच्या नाटककारांनी, वारंवार असली नाटकं लिहून मराठी प्रेक्षकांना मात्र मोठं होण्याची संधीच दिली नाही!

डॉ. अ. वा. वर्टी यांचं 'राणीचा बाग' हे या काळातलं आणखी एक महत्त्वाचं नाटक. खूप घनदाट आशय असलेलं हे नाटक लोकप्रिय झाल्याचीही नोंद आहे. याच वेळी अनंत काणेकरांनी इब्सेनच्या 'डॉल्स हाऊस'चा 'घरकुल' या नावानं आणि सो मिनच्या 'अटेन्शन' या नाटकाचा 'फास' या नावानं अनुवाद केला होता. अशा अनुवादांची, आपण कुठे आहोत आणि इतरत्र काय चाललं आहे? हे लक्षात येण्यासाठी, नेहमीच गरज असते. स्वातंत्र्यपूर्व काळापासून मराठी साहित्यिकांनी ही गरज कायम भागविलेली आहे. वि. वा. शिरवाडकरांनी देखील या दशकात, काही रसरशीत रूपांतरं करून मराठी साहित्यात मोलाची भर घातली आहे. ....ऑस्कर वाईल्डच्या आयडियल हजबंडचं 'दूरचे दिवे' आणि मेटरलिंकच्या मोना वानाचं 'वैजयंती' अशी रूपांतरं त्यांनी केली. ज्या साहित्यिकांना भव्य-दिव्य-उदात्त अशा सगळ्याच विषयांचं आणि व्यक्तींचं आकर्षण वाटत राहिलं. त्यात तात्यासाहेब शिरवाडकर अग्रणी होते. त्यांचं स्वतंत्र ऐतिहासिक नाटक 'दुसरा पेशवा' १९४८ साली आलं. प्रेम आणि पराक्रम या दोन्ही गुणांचा शोध त्यांनी पहिल्या बाजीरावांच्या व्यक्तिमत्त्वातून घेतला आहे.

आचार्य अत्र्यांनी या पूर्वीच 'साष्टांग नमस्कार' पासून मराठी प्रेक्षकांना आणि वाचकांनाही, मोकळेपणानं हसायला शिकवलं होतं. या दशकात त्यांचं 'जग काय म्हणेल' हे गंभीर स्वरूपाचं नाटक आलं. या नाटकाचा विचार करताना, आशय आणि अभिव्यक्ती या दोन्ही संदर्भांत अत्र्यांवरसुद्धा इब्सेनचा प्रभाव होता, असं म्हटलं तर अतिशयोक्ती ठरणार नाही. 'तुका म्हणे आता' हे पु. ल. देशपांडे यांचं समृद्ध नाटक. पण चटपटीत नाट्यप्रयोग पाहणाऱ्या या दशकातल्या प्रेक्षकांनी पु. ल. देशपांडे यांना फारसं गंभीरपणे घेतलेलं दिसत नाही. श्री. पु. भा. भावे यांची सगळीच नाट्यरचना त्यांच्या वैयक्तिक स्वभावाशी आणि मतांशी सुसंगत अशी आहे. 'विषकन्या' ही त्याच प्रकारच्या नाट्यलेखनाची सुरुवात होती, असं म्हणायला हरकत नाही.

थोडक्यात म्हणजे, या काळात चकचकीत नाट्यनिर्मितीत मराठी रंगभूमी गर्क होती. काही सामाजिक समस्यांना नाटककारांनी जरूर हात घातला. पण नाटक करताना त्यातलं सामाजिकपण जाऊन कौटुंबिकपण शिल्लक राहिलं. बऱ्याच नाटककारांना इब्सेननं मोहिनी घातली होती. पण समस्येच्या गाभ्यापर्यंत जाण्याचा इब्सेनचा निर्धार आणि धाडस त्यांच्यांत नव्हतं. त्यामुळे इब्सेनी आव आणला गेला. 'समाजात काही घडलं की लिही नाटक किंवा ठोक एखादी कादंबरी', असलं प्रतिबिंब पडावं, असं इथे अजिबात अपेक्षित नाही. (म्हणूनच आपण पूर्वीच्या नाट्यकृतींचा संदर्भ धुंडाळून पाहिला.) कलावंतांच्या मनात बदलत्या संदर्भांच्या जाणिवा झिरपत असतात आणि त्याचे परिणाम, त्यांच्याही नकळत, त्यांच्या कलाकृतीत, योग्य वेळी उमटतात. परंतु, या काळात, नाटक हा साहित्यप्रकार, केवळ व्यावसायिक

सादरीकरणासाठीच निर्माण होत असल्यामुळे कदाचित, अन्य परिवर्तनाचं प्रतिबिंब पडल्याचं दिसत नाही.

या दशकात मराठी नाट्यलेखनाच्या संदर्भात एक महत्त्वाची घटना घडली. मराठी रंगभूमीचा शतकोत्सव साजरा झाला. १९४३ साली सांगलीला आणि पुढच्याच वर्षी म्हणजे ४४ साली मुंबई आणि अन्य शहरांतूनही तो साजरा करण्यात आला. मुंबईत साहित्यसंघानं यजमानपद भूषविलं होतं. डॉ. अ. ना. भालेराव यांचे अथक परिश्रम, कल्पकता आणि रंगभूमीसाठी तन-मन-धन अर्पण करण्याची वृत्ती या मुळे केवळ एक उत्सव, गॅदरिंग असं स्वरूप न राहता अधिक व्यापक आखणी झाली. अनेक हौशी संस्था यात सामील झाल्या. केवळ व्यावसायिक दृष्टिकोन न ठेवता रंगभूमीसाठी काही वेगळं करावं, अशी प्रवृत्ती निर्माण झाली. १९५०-५१ साली मुंबईतल्या भारतीय विद्याभवन या संस्थेनं आंतर महाविद्यालयीन एकांकिका स्पर्धांना प्रारंभ केला.... आणि नव्या नाट्यलेखनाचा प्रवाह मोकळा झाला. पुण्यात पी. डी. ए., महाराष्ट्रीय कलोपासक, भरत नाट्य संशोधन मंदिर या संस्था कार्यरत होत होत्या. प्रयत्नपूर्वक नव्या पद्धतीच्या नाटकांचं लेखन होऊ लागलं.

या सगळ्या हालचालींची सुरुवात या दशकात झाली असली, तरी नाट्यलेखनाचा कणा अजून व्यवसायातच होता हे लक्षात ठेवूनच आपल्याला पुढच्या टप्प्याकडे पाहायला पाहिजे.

१९५१ ते १९६५ या पंधरा वर्षांच्या कालखंडात उदंड नाट्यलेखन झालं. स्वातंत्र्यानंतरच्या तीस-पस्तीस वर्षांत ज्या नाटककारांनी आपला ठसा मराठी रंगभूमीच्या इतिहासावर उमटवला, त्यांनी या पंधरा वर्षांतच हजेरी लावली आहे. अगदी आकडेवारीच्या भाषेत बोलायचं झालं तर, मो. ग. रांगणेकर यांनी या टप्प्यातही, 'पतित एकदा का पतित सदा', 'हिमालयाची बायको', 'सं. अमृत' इ. दहा नाटकं लिहून प्रकाशित केली. मागच्या टप्प्याचा विचार करताना आपण रांगणेकरांच्या संदर्भात जी निरीक्षणे नोंदवली होती, त्यातले काही संदर्भ बदलले गेले किंवा काही दुरुस्त करावे लागतील अशी स्थिती या कालखंडात झालेली दिसत नाही. विजय तेंडुलकरांनी 'श्रीमंत', 'माणूस नावाचं बेट', 'मी जिंकलो मी हरलो', 'सरी ग सरी' आदि सात नाटकं दिली. विजय तेंडुलकर हे आपल्या काळातले अतिशय महत्त्वपूर्ण नाटककार आहेत. त्यांनी नाट्यसंदर्भात आमूलाग्र बदल केले. त्याविषयी आपण नंतर पाहणारच आहोत.

संगीत नाटक म्हणजे मराठी रंगभूमीचा मानदंड, संगीत नाटक मराठी प्रेक्षकांना, की श्रोत्यांना (?) सततच हवं हवंसं वाटत आलं आहे. पण ज्यावेळी नाटकांना संगीत जलशाचं स्वरूप आलं त्यावेळी प्रेक्षकांनी तिकडे पाठ फिरवली. या नाटकांचं स्वरूप बदलण्याची गरज होती. ते काम १९३३ साली 'नाट्यमन्वंतर' या संस्थेनं, श्री. वि. वर्तकांचं 'आंधळ्यांची शाळा' हे नाटक सादर करून केलं. नाट्यपदांच्या ऐवजी भावकविता किंवा भावगीत वाटेल अशी गाण्यांचा समावेश नाटकात झाला. त्या योगे संगीत नाटकाची परंपरा जिवंत राहिली.

आपण, तूर्तास अवलोकन करतो आहोत त्या कालखंडात विद्याधर गोखले यांची, 'अमृत झाले जहराचे', 'मंदारमाला', 'सुवर्णतुला', 'पंडितराज जगन्नाथ' यांसारखी सहा नाटकं आली. विद्याधर गोखल्यांनी संगीत रंगभूमीच्या खूप चुका दुरुस्त केल्या. सगळे अतिरेक काढून टाकले. जुन्या पद्धतीचंच संगीत नाटक, नव्या पद्धतीनं लिहिलं. हे काहीसं 'ओल्ड वाईन इन न्यू बॉटल' सारखं होतं. पण गोखल्यांचा उर्दूचा व्यासंग, अभिजात रसिकता, शृंगाराकडे पाहण्याची निकोप दृष्टी आणि पांडित्य यामुळे त्यांची नाटकं भारदस्त झाली. अजूनही जुन्या संगीत नाटकांचं नाव निघालं की पूर्वस्मृतींनी बेजार (Nostalgic) होणारे काही प्रेक्षक अशा नाटकांची वाट पाहतच होते. त्यांनी या नाटकांना उदार आश्रय दिला. गोखल्यांनी संगीत नाटकाचं स्वरूप कालानुरूप बदललं. संगीत नाटक केवळ श्रवणीयच नाही, तर वाचनीयसुद्धा असू शकतं, असा बदल त्यात घडवून आणला.

बाळ कोल्हटकरांची नाटकं हा मराठी रंगभूमीच्या प्रवासातला महत्त्वाचा टप्पा आहे. कोल्हटकरांनी या कालावधीत, 'वेगळं व्हायचंय मला', 'आकाशगंगा', 'दुरितांचे तिमिर जावो' आणि 'वाहतो ही दूर्वांची जुडी' अशी सहा नाटकं आणली. कोल्हटकरांनी नाट्यभाषेचे संदर्भ बदलले. नाटकात काहीशी जड भाषा लिहावी लागते, अशी समजूत त्यांनी रद्द केली. मराठी प्रेक्षकांची जी भाषा होती, म्हणजे साठ सालाच्या आसपासची, मध्यमवर्गीय मराठी कुटुंबांची भाषा, ती त्यांनी उचलून नाटकात आणली. जशीच्या तशी नाही, तर गोड करून, भाव-भावनांनी थबथबवून.... कमालीची आकर्षक भाषाशैली, काव्यात्मक लयबद्धता, सोप्या सोप्या काव्यपंक्तीचा वापर, भारतीय संस्कृतीचा सूक्ष्म अभ्यास, इतिहासाची जाणकारी, महाराष्ट्रातल्या कुठल्याही गावात, खेड्यात कोणत्याही दर्जाच्या एकाही प्रेक्षकांच्या डोक्यावरून जाईल असा एकही शब्द, एकही कल्पना न वापरण्याची घेतलेली खबरदारी आणि गरज नसतानाही, ऊर फाडून ठासून भरलेल्या कौटुंबिक जिव्हाळ्याचं कथानक, त्याचं तितकंच गडदपणे केलेलं सादरीकरण, हे कोल्हटकरांच्या यशाचं रहस्य असावं, असं माझं मत आहे. 'वेगळं व्हायचंय मला' सारख्या नाटकातल्या समस्या, (अनेकदा कृतक् असल्या तरी) त्या काळच्या मराठी मध्यमवर्गीयांच्या समस्या होत्या. त्यामुळे प्रेक्षकांना ती स्वत:ची नाटकं वाटली. इथे एका संदर्भाचा मला आवर्जून उल्लेख करावासा वाटतो. तो म्हणजे १९६२ सालच्या चीनच्या आक्रमणानंतर वीरश्रीयुक्त भाषणांनी युक्त, राष्ट्राभिमान जागृत करणारं, 'सीमेवरून परत जा' सारखं नाटक बाळ कोल्हटकरांनीच लिहिलं! बाळ कोल्हटकरांची नाटकं वारंवार वाचणारा एक वाचकवर्ग त्या काळी महाराष्ट्रात होता. गफलत इतकीच झाली की, त्यांचं यश पाहून अनेक बाळ कोल्हटकर निर्माण झाले. त्यांनी रंगमंचावर आणून सोडलेल्या 'ताईटल्या आणि दादीटल्यांनी' मराठी नाटकात नंतर प्रचंड धुमाकूळ घातला. या तोतया कोल्हटकरांनी मराठी नाट्यव्यवहार पंधरा-वीस वर्षं मागे नेऊन परत रांगेत उभा केला.

याच सुमाराला मराठी रंगभूमीच्या संदर्भात एक भारदस्त घटना घडली. वसंत कानेटकर

या नाटककाराचं नाटक रंगभूमीवर आलं, 'वेड्याचं घर उन्हात'. आपल्या त्याच त्या चाकोरीत आनंदानं फिरत बसलेल्या नाट्यलेखनाची कोंडी कानेटकरांनी फोडली. मराठी नाट्यलेखन बोटाला धरून काळाच्या रांगेत नेलं. सिग्मंट फ्राईड या मानसशास्त्रज्ञाचे मनोविश्लेषणाविषयीचे विचार सगळ्या जगात गांभीर्यानं स्वीकारले गेले होते. त्यांनी मराठी साहित्यातही शिरकाव करून घेतला होता. फक्त मराठी नाटकात ते आलं नव्हतं. कानेटकरांनी ते प्रथम नाट्यलेखनात आणलं. नाट्यलेखनाचे अनेक संदर्भ कानेटकरांनी बदलले. हा एक प्रायोगिक नाटककार होता आणि भरभराटीचा व्यवसाय करूनही तो प्रायोगिकच राहिला. 'वेड्याचं घर'ची रचना तीन अंकीच आहे; पण त्यात काही प्रवेश हे भासचित्र किंवा दिवास्वप्नं आहेत. कानेटकरांनी कंसातली भाषा पण बदलली. प्रकाशयोजनेतील रंगाचा सुद्धा ते उल्लेख करू लागले. मनोविश्लेषणाचा आधार घेऊन कानेटकरांनी 'वेड्याचं घर उन्हात' मध्ये, कोल्हटकरी अश्रूंचे कढ आणले नाहीत, तर गळ्यापर्यंत आवंढा दाटून आणला. म्हणजे आपण सुरुवातीला विचार केला होता तसा दुहेरी समतोल साधला. ढसढसा रडणं म्हणजे कुठेतरी एकरूप होणं, पण घशाशी आवंढा दाटणं म्हणजे नाट्यातल्या कारुण्याची जाणीव होणं, उत्कट नाट्यानुभव येणं, सत्याभास होणं! 'वेड्याचं घर उन्हात' या नाटकाचं पुस्तक म्हणजे साहित्याच्या आणि नाटकाच्या अभ्यासकाच्या दृष्टीनं संग्राह्यच नव्हे तर आवश्यक गोष्ट आहे. एकदा वाचायला सुरुवात केल्यावर खाली ठेवता येणार नाही, अशी नाट्यसंहिता, दिग्दर्शक म्हणून भालबा केळकरांचा प्रदीर्घ लेख आणि प्रमुख भूमिका करणाऱ्या डॉ. लागू यांचा, भूमिकेचं विश्लेषण करणारा विचारलेख, हे नाटकाच्या पुस्तकात मराठीत प्रथमच घडलं आहे. याच सुमाराला कानेटकरांनी 'प्रेमा तुझा रंग कसा' ही सुखान्तिका दिली. नर्म विनोद, चपखल मांडणी आणि प्रेमासारख्या विषयावरचं खुसखुशीत भाष्य. कानेटकरांनी अनेक संदर्भ बदलले, असा उल्लेख मी आधी केला होता... त्या संबंधात आणखी एका नाटकाचा विचार करून आपण पुढे जाऊ. ....आत्तापर्यंत मराठीतल्या ऐतिहासिक नाटकांत सगळी पात्रं, कंसात तलवार उपसूनच बोलत आली होती. कानेटकरांच्या 'रायगडाला जेव्हा जाग येते' या नाटकात प्रथम शिवाजी महाराजांनी तलवार उपसली नाही. जिरेटोप पण खाली ठेवला आणि काळजाच्या तळापासून 'शंभूबाळ' अशी हाक घातली! ऐतिहासिक पुरुषातल्या माणूसपणाचा शोध घेण्याचा हा पहिला प्रयत्न होता. मला असं वाटतं की 'महाराष्ट्र' ही पातळी ओलांडून भारतीय स्तरावर जाण्याचे पहिले काही प्रयत्न कानेटकरांच्या या नाटकांनी झाले. वसंत देवांनी त्यांची यथार्थ हिंदी भाषांतरं केलेली आहेत.

या कालखंडाचं आणखी एक वैशिष्ट्य म्हणजे श्री. ना. पेंडसे यांच्यासारख्या खंद्या कादंबरीकारानं आपल्या कादंबऱ्यांना स्वत:च नाट्यरूप दिलं. त्यातलं 'गारंबीचा बापू' या एकाच नाटकाचं उदाहरण पुरेसं आहे. कोकणच्या निसर्गरम्य पार्श्वभूमीवर घडणारी अफाट बापूच्या यशाची कहाणी त्यांनी तितक्याच समर्थपणे नाटकात उभी केली.... एक लक्षात ठेवलं पाहिजे की ही दोन वेगळी माध्यमं आहेत आणि दोन्ही माध्यमांचा पेंडसे यांनी अगदी

स्वतंत्र विचार केला होता. बापूच्या जन्माचं रहस्य उलगडल्यानंतर येणारा उत्कर्षबिंदू बरोब्बर पकडून त्यांनी ते नाटक तिथेच संपवलं, पण कादंबरीतलं कथानक पुढे आणखी चालू राहिलेलं आहे. एखाद्या उत्कृष्ट साहित्यकृतीचं नाट्यरूपांतर कसं व्हावं, याचा हा वस्तुपाठच होता. त्यांच्या पावलावर पाऊल टाकून व्यंकटेश माडगूळकर यांनी आपल्या 'बनगरवाडी'चं नाट्यरूपांतर सादर केलं. तर गो. नी. दांडेकरांनी आपल्या 'शितू', 'पवनाकाठचा धोंडी' यांसारख्या कादंबऱ्यांना नाट्यरूप दिलं.

समकालीन घटनांनी प्रेरित होऊन नाट्यरचना करण्याची परंपरा सगळीकडेच आहे. त्यात दोन प्रकार पडतात. घटनेचा आधार घेऊन काही विचार मांडणं, समाजाला सावध करणं आणि दुसरा प्रकार असा की, त्या घटनेतल्या सनसनाटी भागाचं नाट्यीकरण करून एक व्यावसायिक नाट्यकृती निर्माण करणं. आचार्य अत्र्यांच्या 'तो मी नव्हेच' आणि 'बुवा तेथे बाया' या नाटकांचा समावेश पहिल्या प्रकारात होतो आणि मधुसूदन कालेलकर यांच्या 'अपराध मीच केला' या नाटकाचा समावेश दुसऱ्या प्रकारात होतो, असं माझं प्रांजळ मत आहे.

पु. शि. रेगे यांची याच सुमारास प्रसिद्ध झालेली 'रंगपांचालिक', 'कालयवन', 'माधवी एक देणे' ही नाटकं म्हणजे मराठी नाट्यवाङ्मयातली लेणी आहेत, असं मला वाटतं; पण ती शक्यतो वाचलीच जावीत (त्याचे प्रयोग होऊ नयेत) अशी खूणगाठ बांधूनच ती लिहिलीत की काय अशा संशयाला जागा आहे.

आत्तापर्यंत फार्स, म्हणजे प्रहसन, मराठी रंगभूमीवर सादर केलं गेलं नव्हतं. पूर्वी 'फार्स' या नावाखाली सादर झालेली नाटकं, म्हणजे 'गुलाबछकडीचा फार्स' वगैरे. ही फार्सिकल कॉमेडी या प्रकारातली नव्हती. विनोदी नाटकं लिहिली गेली, त्यांची संख्या देखील भरपूर आहे. पण त्या सगळ्या Light comedies होत्या. नव्या फार्सची व्याख्या करताना पाश्चात्त्य टीकाकारांनी 'It's an organized chaos' असं म्हटलंय. म्हणजे 'केऑस' आहे. गोंधळ आहे. पण तो 'ऑरगनाइज्ड्' आहे. पूर्ण तयार करून, आखून घातलेला गोंधळ आहे. अशा फार्सची पायाभरणी याच कालखंडात बबन प्रभू यांनी केली. 'दिनूच्या सासूबाई'सारखी त्यांची चार प्रहसनं प्रसिद्ध झाली आहेत. पाश्चात्त्य, विशेषत: फ्रेंच रंगभूमीच्या बरोबर चार पावलं चालण्याचा हा प्रयत्न होता, म्हणून त्याची नोंद ठेवणं भाग आहे.

शिरवाडकरांच्या शेक्सपिअरभक्तीचं फलित म्हणून या काळात 'ऑथेल्लो' आणि 'राजमुगुट' ही दोन भाषांतरितं नाटकं मराठी नाट्यसाहित्यात विराजमान झाली. 'आई' नावाच्या नात्याचं चित्रण मराठी साहित्यात मंगलमय, उदात्त, त्यागी वगैरे वगैरे संकल्पनांनी युक्त असंच झालेलं होतं आणि आहेही. पण या नात्यातही काही दारुण, विदारक असं लपून राहू शकतं, याचा शोध शिरवाडकरांनी कोणताही आव न आणता ते समोर उलगडून दाखवलं.

पु. ल. देशपांडे यांची, 'अंमलदार' आणि 'सुंदर मी होणार', ही रूपांतरित आणि



अनुक्रमणिका






'भाग्यवान' आणि 'तुझे आहे तुजपाशी', ही स्वतंत्र नाटकं आली. त्यांचं 'भाग्यवान' हे नाटक तितकंसं भाग्यवान ठरलं नाही; पण 'तुझे आहे तुजपाशी' नं अमाप लोकप्रियता मिळवली आणि ती अजूनही संपत नाही. बदललेल्या काळाचा संदर्भ कलाकृतीला कसा उपयोगी पडतो, याचं हे उत्तम उदाहरण आहे. गांधीयुगाचा अस्त झाला होता, पण गांधीवाद मात्र संपला नव्हता. गांधीवादाचा आत्मा गायब करून, त्याच्यातल्या कर्मकांडाचा उदो उदो आणि अतिरेक करीत वावरणाऱ्या अनेक पिल्लांचा सुळसुळाट समाजात झाला होता. त्याविरुद्ध कुणी शब्द काढायला धजत नव्हतं. कारण 'गांधी' या शब्दात मंत्रसामर्थ्य होतं. पुलंनी 'तुझे आहे तुजपाशी' मध्ये गांधीवादाच्या आदराला धक्का न लावता या कर्मकांडाची मनसोक्त टिंगल केली. जे प्रत्येकजण करू इच्छित होता, ते पुलंनी केलं. शिवाय गांधीवादी आचार्यांच्या पुढ्यात रसिकाग्रणी काकाजींचं पात्र उभं केलं. त्यावेळच्या तरुण-तरुणींची प्रातिनिधिक पात्रं तोंडी लावायला घेतली आणि एक भन्नाट रसायन तयार झालं! ही या कालखंडाची मराठी रसिकांना भेट आहे असं मला वाटतं.

नाट्यसाहित्याच्या दृष्टीनं यावेळी एक महत्त्वाची घटना घडली. १९५४ साली 'महाराष्ट्र राज्य नाट्यस्पर्धा' सुरू झाली. अशा नाट्यस्पर्धा चालू असणारं महाराष्ट्र हे एकमेव राज्य आहे. त्यामुळे केवळ पुण्या-मुंबईतच असणारं नाटकाचं वातावरण महाराष्ट्रातल्या गावोगावी पोहोचवलं गेलं. ठिकठिकाणी नाट्यकलाकारच नव्हे तर नवे नाटककार तयार झाले. अगदी सहज नजर टाकली तरी मोठी यादी तयार होते.... पुण्यात गो. गं. पारखी, शं. गो. साठे, सतीश आळेकर, श्रीनिवास भणगे, अहमदनगरला मधुकर तोरडमल, नागपूरला पुरुषोत्तम दारव्हेकर, औरंगाबादला अजित दळवी, प्रशांत दळवी, नांदेडला दत्ता भगत, लातूरला श्रीराम गोजमगुंडे, साताराला तुषार भद्रे... ही सहज आठवलेली नावं आहेत! या सर्वांना 'नाट्यव्यवसाय' नावाचा पोटापाण्याचा ताण, त्यावेळी तरी नव्हता. त्यामुळे या सर्वांनी मिळून मुक्तपणे नाट्यसाहित्य आणि रंगभूमी समृद्ध केली. यांपैकी काहीजण पुढे मुख्य प्रवाहाला जाऊन मिळाले, पण ज्या नाट्य-वातावरणात त्यांचा स्वभाव-पिंड तयार झाला होता, ते संस्कार घट्ट असल्यामुळे यांच्यापैकी कुणी न पटणाऱ्या तडजोडी केल्याचं दिसत नाही.

याचवेळी मुख्य प्रवाहाची वाटचाल चालूच होती आणि त्या प्रवाहातले मुख्य नाटककार होते, विजय तेंडुलकर...

आत्तापर्यंत मराठी नाटकात एक गोष्ट सांगण्याचा प्रयत्न असे. तेंडुलकरांनी, 'नाटकाची गोष्ट काय?' हा प्रश्न कालबाह्य ठरवला. माणसाच्या अंतर्मनाचा शोध, हा त्यांच्या नाटकांचा कणा आहे असं दिसतं. साधी दिसणारी, सोपी वाटणारी, ओबडधोबड माणसं हिंसक का होतात? वासनेच्या आहारी का जातात? त्या संदर्भात त्यांचं अस्तित्व म्हणजे नेमकं काय आहे? असे आत्तापर्यंत मराठी नाटककारांना, अपवाद वगळता, न पडलेले प्रश्न तेंडुलकरांना पडायला लागले आणि त्यांनी ते प्रश्नच नाटक म्हणून मांडले. कोणतंही तत्त्वज्ञान सांगत बसले नाहीत. कसल्याही 'इझमचा' (Ism - doctrine) पुरस्कार केला नाही. मला असं

वाटतं की हे एक प्रकारचं Strip-tease होतं. म्हणजे वस्त्रहरणच, पण स्वत:च आपलं केलेलं. त्यामुळे संस्कृतिसंरक्षकांना विशेष धक्के बसले. असे हे स्वघोषित 'सांस्कृतिक पोलिस' जगभर असतात आणि आहेतच. त्यांनी काळाच्या अंमळ पुढे गेलेल्या साहित्यकृतींचे गळे घोटण्यातच धन्यता मानली आहे. असो. उदाहरणादाखल तेंडुलकरांच्या त्या काळातल्या तीन-चार नाटकांची दखल घेऊ. 'शांतता, कोर्ट चालू आहे' या नाटकानं स्त्री-पुरुष संबंधातले चक्रावून टाकणारे नैतिक प्रश्न धाडसानं पुढे मांडले. या नाटकाला कमलादेवी चटोपाध्याय पारितोषिक मिळालं. ते चौदा भाषांतून भाषांतरित झालं आणि त्या निमित्तानं मराठी नाट्यवाङ्मय खऱ्या अर्थानं 'भारतीय' पातळीवर गेलं.

तेंडुलकरांच्या 'गिधाडे' या नाटकानं, नाटकातल्या संवाद–भाषेचे संकेत मोडले. त्यावर पुरेसे वाद-विवाद झालेले आहेत आणि ते पुस्तकरूपानं सुद्धा उपलब्ध आहेत. या ठिकाणी मला एवढंच नोंदवायचं आहे की आशय आणि विषयाबावत एक कोंडी फोडून मराठी नाटक Global पातळीवर जाऊन पोहोचलं. तीच गोष्ट 'घाशिराम कोतवाल' या नाटकाची. भालचंद्र नेमाडे यांनी सांगितलेली देशीपणाची सगळी परिमाणं या नाटकाला लागू पडतात. लोककलांचा वापर करवून घेऊन, संगीत नाटकाची मर्मस्थळं जाणून, तमाशा किंवा लोककलेचा लवचिकपणा सोबत घेऊन, एक आधुनिक मराठी, संगीत नाटक सादर करण्याचा हा महत्त्वपूर्ण प्रयत्न होता. जागतिक स्तरावर त्याचं झालेलं स्वागत हेच सिद्ध करतं. तेंडुलकरांच्या नाटकांचा एक महोत्सव नुकताच अमेरिकेत साजरा झाला. त्यांनी मराठी नाटक आंतरराष्ट्रीय स्तरावर नेलं, हे खरं!

याच कालखंडात आलेलं 'एक शून्य बाजीराव' हे चिं. त्र्यं. खानोलकरांचं नाटक हा मराठी नाट्य साहित्यातलं एक महत्त्वाचं वळण नव्हे, तर टप्पा आहे. वळण यासाठी नाही, की त्या वळणावरून पुढे गेलेली नाटकं नंतर निर्माण झालेली नाहीत. स्वत: खानोलकरांनीही, विपुल नाट्यलेखन करूनही, दुसरं तसं लिहिलं नाही. तीन पातळ्यांवर चालणारं हे पहिलं मराठी नाटक. बाजीराव या मुख्य पात्राची एक पातळी, नाटकात एक नाटक आहे, त्याची एक पातळी आणि नेहमीची वास्तवाची पातळी आहेच. प्रथमदर्शनी सगळंच विसंगत आणि अनाकलनीय वाटणाऱ्या या नाटकात एक कलात्मक सुसंगती आहे.... नाटकाचं मूल्यमापन, आस्वादन किंवा समीक्षा करण्याची ही जागा आणि प्रयत्नही नाही. पण आपलं वैचारिक आयुष्य तळापासून ढवळून काढणारा हा नाट्यानुभव आहे. म्हणूनच प्रत्यक्ष रंगभूमी आणि नाट्यवाङ्मय या दोन्ही पातळींवरचा हा एक अर्थपूर्ण थांबा आहे.

असंच दोन्ही पातळींवर अर्थगर्भ परिणाम करणारं 'नटसम्राट' याच कालखंडातलं नाटक. तेजस्वी साहित्यगुण आणि खिळवून ठेवणारे नाट्यगुण यांचा असा समुच्चय झालेली नाटकं मराठीत फार कमी. म्हणूनच शेक्सपिअरच्या 'किंग लीअर' वरून स्फूर्ती घेऊन ते लिहिलेलं असलं तरी 'संपूर्ण स्वतंत्र कलाकृती' म्हणून ज्याचं स्थान अढळ आहे असं तात्यासाहेब शिरवाडकरांचं एक श्रेष्ठ नाटक.

या कालखंडात रत्नाकर मतकरी यांनी बरंच नाट्यलेखन केलं. त्यातल्या 'लोककथा ७८' आणि 'आरण्यक' या महत्त्वाच्या कलाकृतींची दखल घ्यायलाच हवी. प्रत्यक्ष संवाद न लिहिता, उत्स्फूर्तपणे घडवलेलं नाटक, असा नवा प्रयोग त्यांनी लोककथेमध्ये घडवला. तसंच, आरण्यकमधल्या महाभारतातल्या व्यक्तिरेखांना मुक्तछंदात्मक पद्यरूपाने मांडण्याचा प्रयोगही मराठीला नवाच. म्हणूनच साहित्यमूल्यांच्या संदर्भात या दोन नाटकांना डावलून चालणार नाही....

आयुष्यात अनेक गोष्टी निरर्थकपणे घडत असतात, असं आपल्याला वाटतं; पण तसं ते असतं का? मध्यमवर्गीयांच्या या अर्थहीनत्वाचाच शोध उपरोधानं करण्याचा प्रयत्न या काळात सतीश आळेकरांनी केला. त्यांची नाटकं वाचताना हसू येतं. पण आळेकरांनी इथे नाट्यांतर्गत विनोदाचा संदर्भ बदलला आणि Black Humour मराठी रंगमंचावर आणून उभा केला. कीर्तनशैलीचा वापर करून 'मृत्यू' या विषयावर एक 'विनोदी सदृश्य' नाटक निर्माण करणं ही कल्पनाच चमत्कारिक आहे. 'महानिर्वाण' मध्ये त्यांनी ते साधून दाखवलं. एका तरुणाच्या भावविश्वाचा शोध घेणारं 'महापूर' हे नाटकही तसंच. तरुणाचं स्वप्न आणि भाबडा आदर्शवाद यांतला हा मानसिक संघर्ष आहे. त्यानंतरचं 'बेगम बर्वे' देखील असंच वेगळ्या विश्वाचा मागोवा घेतं. पण त्यानंतर मात्र आळेकरांना परिप्रेक्ष्य गवसत नाही की काय अशी शंका येते.... असं का घडावं?

प्रा. मधुकर तोरडमलांनी खूप महत्त्वाची नाटकं लिहिली. पण मला असं वाटतं की, त्यांच्यातल्या नाटककारावर नटानं, दिग्दर्शकानं आणि नाट्यव्यवसायिकानं कुरघोडी केली. त्यामुळे, काय सांगायचंय, यापेक्षा काय चालेल, हा विचार महत्त्वाचा ठरला. तरीही 'गुडबाय डॉक्टर', 'भोवरा', 'आश्चर्य नं. १०' आणि 'झुंज' अशी साहित्यिक मूल्यं असलेली नाटकं त्यांनी दिली. त्यातही, कोणताही आव न आणता, कोणताही आक्रस्ताळेपणा न करता दलित-सवर्ण असा विषय हाताळणारं त्यांचं 'झुंज' हे नाटक मला खूप महत्त्वाचं वाटतं. राखीव जागा वगैरेच्या संदर्भात 'डिझर्व अॅण्ड देन डिमांड' हे त्यांचं प्रतिपादन विचार करायला लावतं.

याच कालखंडात विश्राम बेडेकरांचं 'वाजे पाऊल आपुले' (रूपांतर), शं. ना. नवऱ्यांचं काव्यात्म 'मन पाखरू पाखरू', मालतीबाई बेडेकरांचं 'हिरा जो भंगला नाही', भाव्यांच्या नाट्य-स्वभावानुसार 'महाराणी पद्मिनी', भि. शि. शिंदे यांचं 'भिक्षुणी वासवदत्ता', सई परांजपे यांचं 'जास्वंदी', वामन तावडेंचं 'छिन्न', असं अर्थपूर्ण नाट्यसाहित्य निर्माण झालं.

राजकीय विचारनाट्याचा एक वेगळा मंच गो. पु. देशपांडे यांनी निर्माण केला. त्या प्रकारात आपलं एक स्वतंत्र स्थान निर्माण करण्यात ते यशस्वी झाले. राजकीय चळवळींचे आणि विचारधारांचे ते अभ्यासक आहेत. त्यामुळे त्यांच्या नाटकांना एक विश्वासार्हता आहे.... 'उद्ध्वस्त धर्मशाळा', 'मामक : पांडवाश्चैव', 'विष्णुगुप्त चाणक्य', असा एक वेगळाचा प्रवाह त्यांनी चालू केला, पण तो त्यांना एकट्यालाच पुढे नेण्याची वेळ आली



अनुक्रमणिका

आहे असं वाटत राहतं.

याच वेळी प्रायोगिक नाट्यलेखनामध्ये नजरेत भरणारी घडामोड केली ती राजीव नाईक, मकरंद साठे, तुषार भद्रे, अरुण नाईक, कुमार देशमुख, चेतन दातार, शफाअत खान, प्र. ल. मयेकर, शांता गोखले, सुहास तांबे या नाटककारांनी.

१९८० ते ९० च्या कालखंडात अनेक स्थित्यंतरं घडली. प्रमुख रंगभूमीवर जयवंत दळवींच्या बहराचा हा काळ ठरला. मनोविकृती आणि प्रकृती याची सीमारेषा किती पुसट आहे, याची भयप्रद जाणीव दळवींनी अतिशय नाट्यपूर्ण रीतींनी करून दिली. 'बॅरिस्टर' ही त्यातली श्रेष्ठ कलाकृती. वृद्धापकाल आणि त्यातलं एकलेपण हा 'संध्याछाया' चा विषय होता तर ध्येयवादी कार्यकर्ता आणि आजचं राजकारण हा 'सूर्यास्त' चा विषय होता.... दळवींचं नाट्यलेखन हा या कालखंडाचा विशेष. श्याम मनोहरांची वेगळ्याच शैलीतली 'हृदय', 'येळकोट', 'यकृत' ही (आशयसमृद्ध) नाटकं आली. त्यांना पोटापुरती दाद मिळाली, असं म्हणता येईल. अजित आणि प्रशांत दळवी या दोन बंधूंची काही सकस नाटकं, ही या कालखंडाची एक जमेची बाजू.

मराठी नाटकांची प्रयोगशाळा असलेली प्रायोगिक किंवा हौशी रंगभूमी, ही जवळ जवळ बंद पडल्यासारखी झाली होती. राज्यस्पर्धेला साचलेपण आलेलं होतं. त्यामुळे त्याची कुणी दखल घेत नव्हतं. व्यावसायिक रंगभूमीच्या प्रवाहात केवळ विनोदी किंवा विनोदी वाटतील, अशा नाटकांची चलती होती. त्यातली काही नाटकं तर इतकी 'इनोदी' की त्याला नाटककाराची सुद्धा गरज पडत नव्हती! एकूणच सगळीकडे गढूळलेलं वातावरण निर्माण झालं होतं.

या काळात, मराठी नाटक स्वत:चे प्रश्न घेऊन उभं राहत नाही, ते कायम परभृत असतं. या आरोपाला दणदणीत उत्तरं देता येईल, अशी आशा निर्माण करणारी दलित रंगभूमी निर्माण झाली. भि. शि. शिंदे यांचं 'काळोखाच्या गर्भात', टेक्सास गायकवाड यांचं 'आम्ही देशाचे मारेकरी', रामनाथ चव्हाण यांचं 'साक्षीपुरम्' आणि 'बामनवाडा', रुस्तुम अचलखांब यांचं 'कैफियत' आणि मुख्य म्हणजे शिल्पा मुंब्रसकर यांनी लिहिलेलं 'झाडाझडती', प्रेमानंद गज्वी यांची 'देवनवरी' आणि 'किरवंत', दत्ता भगत यांची 'खेळिया' आणि लक्ष्यवेधी 'वाटा-पळवाटा', अशा सगळ्या नाटकांनी दलित रंगभूमीच्या संबंधी आशा पल्लवीत झाल्या. पण या नाट्यलेखनानं स्वत:भोवती एक भोवरा निर्माण केला. इतर दलित लेखनाप्रमाणे स्वत:भोवती गिरक्या मारायला सुरुवात केली.... आशादायी प्रवाह कुठेतरी लुप्त झाला.

सुधा करमरकर, रत्नाकर मतकरी सारख्या खंद्या मंडळींनी नेटानं चालविलेली बालनाट्याच्या चळवळीची धुरा पुढे नेण्यासाठी कुणी समर्थ रंगकर्मी समोर येईना. बालनाट्य सादर करणे म्हणजे सुटीतला जोडव्यवसाय उरला. त्यामुळे आधीच कमी असलेलं बालनाट्यसाहित्य आणखी कमी झालं.

मला असं वाटतं की याचं पुष्कळसं कारण मराठी नाटकाचं साचलेपण आणि दूरदर्शनकडे










जातं. खूप वाहिन्या. लेखकांच्यासाठी अचानक रतिबाची कामं निर्माण झाली. त्यात त्यांना पैसा आणि झटपट प्रसिद्धीचा आनंदही मिळायला लागला. काही सन्माननीय अपवाद वगळले तर अभिनेत्यांची आणि अभिनेत्रींची रांग दूरदर्शनमालिकांच्या दारात लागू लागली. सहजसाध्य पैसा हेच ध्येय झालं. कष्ट, उमेदवारी यांची किंमत कमी झाली. त्यामुळे समांतर रंगभूमीची चळवळ जवळजवळ बंद पडली. या सर्वांवर कडी केली ती स्वस्त आणि हातपाय न हलवता, घरातल्या घरात मिळणाऱ्या करमणुकीला चटावलेल्या प्रेक्षकांनी, त्यांनी रंगभूमीकडे पाठ फिरवली.

टी. व्ही. मालिकांनी मराठी रसिकता मारून टाकली. काहीतरी बटबटीतं पाहण्याची चटक मूळ धरू लागली. वाचनाची सवय तर कधीच सुटत चालली होती. या बाबत कुणा तरुणाशी बोलावं तर तो सांगायचा, 'आम्ही इंग्लिश वाचतो!' ....काय वाचतो? ....तर सिडनी शेल्टन, जिफ्री आर्चर्ड, मायकल क्रायटन, रॉबिन कुक्, लुडलुम! ....म्हणजे ही मंडळी अगदी ऑर्थर हेलेला सुद्धा स्पर्श करायला तयार नाहीत.... ती ऑस्कर वाईल्ड, बर्नार्ड शॉ, टेनेसी विल्यम, चेकॉव्ह आणि ऑर्थर मिलर यांच्यासारख्या नाटककारांशी एस. एम. एस. नं तरी संपर्क साधतील का? ....म्हणजे मग 'शेक्सपिअर, कालिदास,' यांच्यासारख्या वस्तू तर दुर्बिणीतूनही न दिसणाऱ्या झाल्या!

साधारणपणे २०००-२००१ मध्ये मी, अशा तऱ्हेनं, नाट्यसाहित्याच्या भवितव्याविषयी, विरक्त व्हायला लागलो होतो. पण त्याच सुमारास नाईकांचं 'साठेचं काय करायचं?' हे नाटक आलं, कुंडलकरांचं 'छोट्याशा सुट्टीत' आलं, मकरंद साठेंचं 'चौक' आलं, आत्ता नुकतंच गिरीश जोशींचं 'फायनल ड्राफ्ट' आलं, यज्ञोपवीतांचं, रूपांतरित 'मनोमीलन' आणि स्वतंत्र 'मळभ' पाहिलं.... माझ्या मनावरचं मळभ आता दूर होतंय. नव्या नाटककारांच्या प्रतिभासूर्याचं दर्शन उगवतीकडे दृग्गोचर होतंय.... त्या तेजात न्हायला मी तयार होऊन बसलोय!

**श्रीनिवास भणगे**
७, मध्वेंदू अपार्टमेंटस्, १४, तपोभूमी सोसायटी, दत्तवाडी, पुणे : ४११०३०
फोन नं. ४३३९५१'२. भ्रमण ध्वनी : ९३७१०१२८१२
E mail : shreebhanage@eth.net



## साभार पोच

**अक्का :** राजेंद्र बाविस्कर, कल्याणी प्रकाशन, शेवगाव (जिल्हा अ.नगर), पृष्ठ ६६
**व्यथा पेरता पेरता :** उषा अंभोरे, शारदा प्रकाशन, ठाणे, पृष्ठ ६०
**आणि उजाडले १४ एप्रिल १८९१ :** विष्णूजी कांबळे, प्रकाशिका सौ. अनिता दिलीप गवळी, कोल्हापूर, पृष्ठ ९६



अनुक्रमणिका






# स्वातंत्र्योत्तर काळातील मराठी साहित्याचे बदलते संदर्भ : आरोग्यविषयक साहित्य



डॉ. अरविंद संगमनेरकर

माणसाची आदिकालापासून जी प्रगती होत गेली, तिला एक विशिष्ट परिस्थिती कारणीभूत ठरली. जे काही नवनवीन शोध लागत गेले, त्याच्यामागे गरज – 'नेसेसिटी' हेच मुख्य कारण आहे. 'नेसेसिटी इज द मदर ऑफ इन्व्हेन्शन.' ही मुख्यतः कुठल्याही शोधाच्या बाबतीत प्रमुख प्रेरणा किंवा 'इंपिडस' असतो.

आदिमानव ज्यावेळी जंगलात राहत होता, त्यावेळी त्याने अणकुचीदार दगडाचा उपयोग प्रथम शस्त्र म्हणून केला. तो पहिला शोधदेखील जंगली जनावरांपासून संरक्षण मिळावं या गरजेपोटीच लागला. दगडाच्या शस्त्रापासून ते अगदी आधुनिक अॅटमबाँबपर्यंत तसेच कॉम्प्युटर, वैद्यकशास्त्रातील एम. आर. आय., सी. टी. स्कॅन इत्यादी सर्व नवीन शोध लागत गेले. या सर्व शोधांची जननी गरज हीच आहे.

वैद्यकीय लिखाण हेही अशा गरजेपोटीच लिहिलं गेलं आणि लिहिलं जात आहे.

पूर्वीच्या काळी म्हणजे साधारणपणे १९६०-६५ च्या पूर्वी सामान्य माणसाच्या आरोग्याच्या दृष्टीने फॅमिली डॉक्टर किंवा वैद्य ही प्रथा सर्वमान्य आणि सर्वत्र रुजलेली होती. त्या काळामध्ये वैद्यलोक स्वतःच भस्म, गुटी, गोळ्या अशी औषधं तयार करीत असत आणि ती तयार केलेली औषधं आपल्या पेशंटला देत असत. औषधं कशी घ्यायची, हे समजावून सांगत असत. याचबरोबर फॅमिली डॉक्टर मंडळी आपआपल्या दवाखान्यात पेशंटला तपासत असत. पेशंटला औषधाच्या गोळ्या, पुड्या, डोस हे कसं घ्यायचं हे लिहून देत असत. अनेकांना जुन्या काळच्या फॅमिली डॉक्टरांची औषधाची बाटली व त्या बाटलीवर कापलेल्या कागदाने दाखविलेले डोसांचे प्रमाण आणि पुढच्या लेबलवर किती डोस केव्हा घ्यायचे हे लिहून दिलेले आठवत असेल. 'डोस घेण्यापूर्वी बाटली हलवून घेणे' अशी छापील सूचना असायची. त्यामुळे डॉक्टर-पेशंटमध्ये आपोआपच संवाद साधला जायचा.

१९६० च्यापूर्वी कन्सलटंटचे प्रमाण अतिशय कमी- जवळजवळ नव्हतेच. पुण्यासारख्या ठिकाणी १९६० च्या पूर्वी अगदी बोटावर मोजण्याइतके वेगवेगळे स्पेशालिस्ट होते. नावंच घ्यायची झाली तर डॉ. घारपुरे, डॉ. मोटवानी हे सर्जन. डॉ. मोदी, डॉ. प्रयाग, डॉ. कोयाजी












हे फिजिशियन, डॉ. बानूबाई कोयाजी, डॉ. टिळकबाई, डॉ. खाडिलकर, डॉ. फाटक हे गायनाकोलॉजिस्ट. डॉ. फडके, डॉ. खलप हे लहान मुलांचे डॉक्टर आणि असेच आणखी दोन-पाच कन्सलटन्ट होते. स्पेशालिस्ट डॉक्टरकडे जाण्याची वेळ फार क्वचितप्रसंगी येत असे आणि कन्सलटन्टकडे जाण्याची वेळ आली तर फॅमिली डॉक्टर बरोबर येत असत. त्यामुळे कन्सलटन्टशी संवाद साधण्याची पेशंटला वेळ येत नसे. १९६०-६५ नंतर स्पेशालिस्ट आणि कन्सलटन्टचा जमाना सुरू झाला. १९८५-९० च्या दरम्यान सुपर स्पेशालिस्टचा जमाना वाढू लागला.

स्पेशालिस्ट आणि सुपर स्पेशालिस्टचे युग सुरू झाले आणि डॉक्टर-पेशंटचा संबंध दुरावला. बऱ्याच वेळा तो तुटला. जेवढा मोठा डॉक्टर तेवढा तो पेशंटशी कमीत कमी बोलणारा, पेशंटला काहीही समजावून न सांगणारा हे रूढार्थाने पक्कं झालं. त्याचबरोबर स्पेशलायझेशनचे प्रकार वाढत गेले. वेगवेगळे नवे आजार माहीत व्हायला लागले. खूप नवे आजार झपाट्याने वाढत गेले आणि त्याचे वेगवेगळे स्पेशालिस्टस् उदयाला आले – डायबेटिसचा स्पेशालिस्ट, हृदयरोग-तज्ज्ञ, कार्डियाक सर्जन, वंध्यत्व स्पेशालिस्टस् इ.इ. पण या स्पेशालिस्ट डॉक्टरांनी पेशंटला खूप काही सांगितलं नाही, माहिती दिली नाही. त्यामुळे आपोआपच आरोग्यविषयक दुवा असणारं, माहिती देणारं साहित्य हे गरजेपोटी बाहेर यायला लागलं.

'आणखी एक महत्त्वाची गोष्ट म्हणजे १९६० च्या पूर्वी स्पेशालिस्ट डॉक्टरांचं फारसं महत्त्वही नव्हतं. पण फॅमिली डॉक्टरांना खूप मान आणि त्यांचं महत्त्व खूप होतं. तो घरातला मेंबर म्हणूनच धरला जात असे. वैद्यकीय क्षेत्राकडे जाणाऱ्या विद्यार्थ्यांचा ओढाही खूप कमी होता. हुशार विद्यार्थी लॉ, संस्कृत, भाषा याकडे जात असत. मेडिकलची फारशी क्रेझ नव्हती, याबद्दलची १९६० च्या आसपासच्या काळातील आपल्या देशातील आणि परदेशातील अत्यंत प्रसिद्ध असलेल्या एका नामवंत सर्जनची गोष्ट ऐकण्यासारखी आहे. हे सर्जन मॅट्रिकच्या परीक्षेत नापास झाले. मुलगा नापास झाल्याचं कळल्यावर वडील रागावून म्हणाले, "तू आपला मेडिकलला जा, तुला काही लॉ किंवा संस्कृत असे हुशार मुलांचे कोर्स जमणार नाहीत." एवढं त्या काळात मेडिकलच्या ॲडमिशनचं महत्त्व कमी होतं.'

थोडक्यात म्हणजे वेगवेगळे आजार-ऑपरेशन यांची माहिती पेशंटला करून देणं गरजेचं झालं आणि या गरजेपोटी आरोग्यविषयक लिखाण सुरू झालं.

### १. कोणत्या स्वरूपात हे लिखाण सुरू झालं?

या गोष्टीचा विचार करण्यापूर्वी थोडंसं आरोग्यविषयक लिखाणाच्या इतिहासाची माहिती करून घेऊया.

मराठीतलं पहिलं आरोग्यविषयक पुस्तक **औषधे आणि कल्पविधी** हे डॉ. जॉन मॅक्लेन्स यांनी १८२८ साली प्रसिद्ध केलं. १९३३ साली रघुनाथ धोंडो कर्वे यांनी

**समाजस्वास्थ्य** हे लैंगिक शिक्षणावर माहिती देणारं पुस्तक प्रसिद्ध केलं. किर्लोस्कर आणि स्त्री मासिकात हळूहळू आरोग्यविषयक लेख येऊ लागले. १९५१ ते १९९९ या काळात साधारण १४४ अनुवादित, १५८ पाठ्यपुस्तकं, योगसाधना आणि व्यायाम यावर ११४, कामजीवन आणि लैंगिक विकारांवर ९४, बाल आरोग्यावर ८९, होमिओपॅथीवर ७३, स्त्री आरोग्यावर ६६, वनौषधींवर ४८, आहार आणि आरोग्यावर ११४ आणि आयुर्वेदावर १८४ अशी पुस्तकं, वेगवेगळ्या काळात प्रसिद्ध झालेली आहेत. यांतील काही अनुवादित आहेत. काही मूळ पुस्तकं आहेत. २००० सालानंतर अनेक नवीन आरोग्यविषयक पुस्तकं प्रसिद्ध होत आहेत. त्यांचे विषय, लेखक वाढत आहेत. यात पुण्या-मुंबईच्या लेखकांचे प्रमाण जास्त आहे; पण आता विदर्भ-मराठवाड्यातील डॉक्टरमंडळीसुद्धा हळूहळू आरोग्याविषयी लिहायला लागली आहेत. विशेषत: वर्तमानपत्रांच्या आरोग्य पुरवण्यांमध्ये आणि मासिकांमध्ये ही नवी मंडळी लिखाण करीत आहेत.

हे वैद्यकीय लिखाण कोणत्या स्वरूपात प्रसिद्ध होत आहे, याचा आता विचार करूया.

## २. वैद्यकीय लिखाणाचे स्वरूप

१. स्फुट लेख, प्रासंगिक लेख-डायरिया, साथीचे रोग, प्लेग, कॉलरा, कावीळ, सर्पदंश, एच. आय. व्ही. अशा तऱ्हेचे लेख.

२. हेल्थ स्टोरीज – डॉक्टरी सत्यकथा, पेशंटच्या गोष्टी, डॉक्टरांचे अनुभव, पेशंटचे अनुभव अशा स्वरूपात काही लेखकांची पुस्तके प्रसिद्ध झाली. या हेल्थ स्टोरीज कोल्हापूरचे डॉ. मुंदरगी, मुंबईचे डॉ. जोशी असे अनेक डॉक्टर लिहीत गेले. पेशंट म्हणून शेठ नावाच्या बाईंनी त्यांच्या मुलीच्या ल्यूकेमियाचे अनुभव **–माझी नीता–** लिहिले होते. अगदी जुना रेफरन्स म्हणून पेशवे काळातील वाईच्या गोडसे भटजींनी लिहिलेल्या **माझा प्रवास** या आत्मचरित्रात प्रवासात अनुभवायला मिळालेले लोकांचे वेगवेगळे आजार यांचे वर्णन केले आहे.

३. तिसरा आविष्कार हा चरित्र किंवा आत्मचरित्राच्या स्वरूपात होता. मुंबईचे प्रसिद्ध गायनाकॉलॉजिस्ट डॉ. बी. एन. पुरंदरे यांचे **शल्यकौशल्य,** मुंबईचे ऑर्थोपेडिक सर्जन डॉ. बावडेकर यांनी लिहिलेलं **कॅन्सर माझा सोबती** किंवा डॉ. अभय बंग यांनी लिहिलेलं **माझा साक्षात्कारी हृदयरोग,** नागपूरच्या प्रसिद्ध नर्स कमलाबाई होस्पेट यांचे आत्मचरित्र यांचा उल्लेख करता येईल. अगदी नवीन सांगायचे झाले तर याच २००५ मध्ये प्रसिद्ध झालेले सौ. भारती कोंडविलकर या नर्सने **चांदणे शिंपित जा** नावाचं थोडंसं आत्मचरित्र, थोडंसं पेशंटचे अनुभव अशा स्वरूपाचं पुस्तक प्रसिद्ध केलेलं आहे. २००४ मध्ये प्रसिद्ध झालेलं डॉ. अलका मांडके यांनी लिहिलेलं डॉ. नीतू मांडके यांचे **हृदयस्थ** हे आत्मचरित्र याच प्रकारचे आहे. या सर्व आत्मचरित्रांत त्या-त्या डॉक्टरांच्या वैयक्तिक आयुष्यातील 'अचिव्हमेंटस्' आणि आलेले अनुभव

आहेत. 'वायडर बेस' किंवा सामाजिक आरोग्य या बाबतीतले विचार कमी दिसतात.

४. चौथे स्वरूप म्हणजे आरोग्यविषयक ललित लिखाण. हे कादंबरी-कथा या स्वरूपात प्रसिद्ध झालेलं आहे. यात काही काल्पनिक, काही सत्य, काही अर्धसत्य असं वेगवेगळं स्वरूप आहे. कै. सौ. कुसुम अभ्यंकरांची **दीपशिखा,** श्रीधर जोशींची **आनंदी गोपाळ,** तसेच **डॉक्टर तुम्हीसुद्धा, थँक्यु मि. ग्लॅड, डॉ. लागू** ही नाटके अशा तऱ्हेचे ललित साहित्य आहे. ते बहुतेक डॉक्टर नसलेल्या लोकांनी लिहिलेलं, काही वास्तव व काहीसं काल्पनिक असं लिखाण आहे. त्यामुळे याचा फारसा विचार करायला नको.

५. पांचट स्वरूप – डिबेट –वादविवाद : **डॉक्टर जगवतात व नागवतात? -** अनिल अवचट, **कन्झ्युमर प्रोटेक्शन लावावा की नाही? डॉक्टर लोक उगाचच तपासण्या करतात का?** असे अनेक वाद आणि त्या अनुषंगाने आलेले लिखाण.

६. फॅमिली प्लॅनिंग-सुखी कुटुंब, कॉपर टी., एडस् यावर कविता, पोवाडे, वचनं, घोषवाक्य आदि आरोग्यविषयक प्रचारी साहित्य.

७. विशिष्ट विषय (स्पेसिफिक सब्जेक्टस्) उदा. प्रसूती, गर्भारपण, बाळंतपण, लैंगिक जीवन – डॉ. विठ्ठल प्रभू, डॉ. शशांक सामक, डॉ. वत्स असे अनेक लेखक आणि अनेक पुस्तकं. पण या सर्वच लिखाणात तोचतोचपणा जास्त आहे, नवीन फारसे नाही.

उदाहरणादाखल काही पुस्तके खालीलप्रमाणे आहेत.

* हृदय आणि हृदयविकार – डॉ. जोशी आणि अनेक छोट्यामोठ्या पुस्तिका.
* दात : दंतकथा – डॉ. मांडे.
* एच. आय. व्ही.
* लहान मुलांचं आरोग्य, आजार, आहार.
* मूलभूत वैद्यकीय विषयावरील शास्त्रीय लिखाण : जग जनुकांचे – हेमा पुरंदरे, डी. एन. ए. – अशोक पाध्ये, कोलेस्टेरॉल.
* हाडांचे आजार – सांधेदुखी, कंबरदुखी
* योग-व्यायाम-आहार-मराठीत अनेक पुस्तकं; पण दर्जेदार पुस्तकं खूप कमी.
* आयुर्वेद – अनेक पुस्तकं. आयुर्वेदाचा अभिमान आणि अभिनिवेश जास्त, शास्त्रीय माहिती कमी.
* होमिओपॅथी-आजीबाईंच्या बटव्यासारखी औषधं पण शास्त्राची माहिती कमी.
* स्त्रियांचे आजार : कळी उमलताना- डॉ. वैजयंती खानविलकर, मेनापॉझ- डॉ. आनंद शिंदे, स्त्रियांचे कॅन्सर इत्यादी.
* अल्टरनेटिव्ह मेडिसिन-चुंबक चिकित्सा, निसर्गोपचार, शिवांबू आदि शास्त्रीय आधार नसलेली पुस्तकं.

डॉ. गाला यांनी वैद्यकशास्त्रातल्या सर्व स्पेशालिटींवर अनेक पुस्तकं लिहिली आहेत. डॉ. म्हसकर, डॉ. पुरंदरे आणि आता अनेक.

८. आरोग्यविषयक क्रमिक पुस्तकं – नर्सिंग कोर्ससाठी, आयुर्वेद – वैद्य रानडे, य. गो. जोशी इ. इ.

९. शासकीय आरोग्य प्रकाशने. अनेक विषयांवर लहान लहान पुस्तिका. महारोग, टी. बी., साथीचे रोग – सरकारी मामल्याप्रमाणे शुष्क-निरस.

१०. दिवाळी अंक – विशिष्ट विषयाला वाहिलेले अंक – शतायुषी – पहिला आरोग्य-विषयक अंक, फॅमिली डॉक्टर, दीर्घायु – डॉ. पी.एच. कुलकर्णी, आरोग्य तेथे – डॉ. दिलीप देवधर, आरोग्य ज्ञानेश्वरी – डॉ. जोशी, आपले स्वास्थ्य – डॉ. दाबक इ.

११. दैनिकांच्या साप्ताहिक आरोग्य पुरवण्या – सकाळ, प्रभात, लोकमत, पुढारी – फारच त्रोटक आणि बहुतेक वेळी आहार आणि सौंदर्य या विषयांवर जास्त भर.

१२. ऑडिओ-व्हिडिओ कॅसेटस् आणि सी. डी. ज् – गर्भसंस्कार, फॅमिली प्लॅनिंग, टी. व्ही. इंटरव्ह्यू, लेक्चर्स इत्यादी.

**३. वैद्यकीय लिखाणांची कारणमीमांसा-प्रेरणा आणि ऊर्मी :**

यात अनेक प्रेरणा आणि ऊर्मी आहेत. त्याची थोडक्यात माहिती खालीलप्रमाणे देता येईल.

१. लिहावंसं वाटतं म्हणून – आऊटलेट फॉर एक्स्प्रेशन्स. काहीतरी सांगायचंय म्हणून केलेलं लिखाण.

२. गरज म्हणून – नीड बेस – डॉक्टर-पेशंट संवाद कमी होत चाललाय, त्यामुळे संवादाचं साधन म्हणून. यातही ज्या विषयावर माणसं एकमेकांशी घरी बोलत नाहीत, डॉक्टरांशी बोलत नाहीत यासाठी जास्त लिहिलं गेलं आहे. उदा. सेक्स, एच.आय.व्ही. वगैरे.

३. कमर्शियल – सुपरस्पेशालिटीच्या डॉक्टरांनी हे जास्त लिहिलं आहे – हार्टअॅटॅक, डायबेटिस इ.

४. कीर्ती, नाव होण्यासाठी – प्रकाश झोतात राहण्यासाठी केलेलं लिखाण.

५. आर्थिक लाभ – विशेषत: दिवाळी अंक आणि जाहिराती या स्वरूपात.

६. वर्तमानपत्राच्या पुरवण्या – सेल वाढवण्यासाठी आणि पानं भरण्यासाठी केलेला खटाटोप.

७. स्टेटस सिंबॉल आणि इगो – लेखक, संपादक म्हणून हाय सोसायटीत मिरवता यावं, विद्वत्ता दाखविता यावी यासाठी.

८. हौस – छापून यावं, टी. व्ही. वर दिसावं हीच हौस.



अनुक्रमणिका

९. मान्यतेचा शिक्का – रेकग्नायझेशन – समाजात, शासकीय दरबारी, रोटरी, लायन वगैरे संस्थांचे सर्टिफिकेटस् मिळावेत यासाठी.
१०. प्रोफेशनल कमिटमेंट – आरोग्याचं ज्ञान शेवटच्या थरापर्यंत पोहोचावं आणि पेशंट ज्ञानी होऊन उपचार घ्यावेत या ज्ञानदानाच्या कार्यासाठी.

### ४. ललित साहित्य आणि वैद्यकीय लिखाण यांतील फरक

लिहिणारा डॉक्टर हा रूढार्थाने लेखक नसतो. त्याला लेखनाची सवय नसते. पुस्तकाचं महत्त्व हे लिहिणाऱ्या डॉक्टरची इमेज, ज्ञान, मोठेपण आणि अनुभव यांवर ठरतं. या दृष्टीने या दोहोतील फरक साधारण पुढीलप्रमाणे आहे.

१. भाषा–ललित साहित्याप्रमाणे यात भाषेचं सौंदर्य कमी असतं. माहिती जास्त असते.
२. पुष्कळशी चित्रं असतात, आकृत्या असतात. पेशंटचे अनुभव यांवर निरूपण असतं.
३. लेखाची लांबी लहान असते. दीर्घकथेप्रमाणे लांबलचक नसतं.
४. लोकं ही पुस्तकं जपून ठेवतात. अंक असूदे किंवा पुस्तक असूदे ते बाईंड करून ठेवतात.

या बाबतीत शतायुषी दिवाळी अंकासंबंधी प्रत्यक्ष घडलेली गोष्ट आहे.

आपल्या महाराष्ट्र राज्याचे माजी मुख्यमंत्री आणि लोकसभेचे माजी सभापती श्री मनोहर जोशी यांची माझी पंधरा-सोळा वर्षापूर्वी अचानक ओळख झाली. डॉ. संगमनेरकर हे माझं नाव ऐकल्यावर जोशीसर मला पटकन म्हणाले, "डॉक्टर, तुमची आणि माझी ओळख गेल्या १०-१२ वर्षांपासूनची आहे." मला काही लक्षात येईना. जोशीसरच पटकन हसून म्हणाले, "डॉक्टरसाहेब, शतायुषीच्या १०-१२ वर्षांपासूनचे अंक माझ्याकडे बाईंड करून ठेवले आहेत. तेव्हापासूनची आपली ओळख."

५. या लिखाणाला ललित साहित्याचे रूढ नियम नाहीत, यात मनोरंजन नाही, माहिती सांगणं हाच मुख्य उद्देश असतो.
६. याला विषयाची मर्यादा नाही.
७. लिहिणारा आर्थिक लाभ – मानधन यांचा फारसा विचार करीत नाही. (डेन्टन कुलीची गोष्ट)
८. त्याच विषयावर नवनवीन आवृत्त्या, नवनवीन माहिती. तोच विषय नव्या स्वरूपात येऊ शकतो.
९. मुख्यता गद्य स्वरूपात. पद्य स्वरूपात कमी.
१०. थोडंसं चाकोरीबद्ध, प्रवचनासारखं. एकाग्र होऊन वाचायला लागावं असं. सहज वाचण्यातली मजा यात नाही.
११. विकत घेऊन वाचतात.
१२. संदर्भ-रेफरन्स म्हणूनही पुस्तक वाचतात.



अनुक्रमणिका

**५. वैद्यकसाहित्याचा ललितसाहित्यावर परिणाम होईल का?**

थोडाफार परिणाम होईल कारण वैद्यक साहित्याला उपयोगिता-युटीलिटी व्हॅल्यू आहे. टीकाकार आणि साहित्यिक काहीही म्हणत असले, तरी वाचकांनी याला साहित्य म्हणून स्वीकारले आहे.

**६. वैद्यकीय लिखाण कुठे कमी पडतंय? :**

विषयांची विविधता अजूनही वाढली पाहिजे. आज वैद्यकीय लिखाण हे योग, आयुर्वेद, व्यायाम, आहार, स्त्रिया आणि मुले या भोवतीच फिरतंय. नवीन विषय आले पाहिजेत. नवीन डॉक्टरलेखक तयार झाले पाहिजेत.

अजूनही खालील वैद्यकीय विषयांवर फारसे लिखाण झालेले नाही. हे विषय पुढीलप्रमाणे.

१. मेडिकल मॅनेजमेंट – घरी, हॉस्पिटलमध्ये, ऑपरेशनच्या आधी-नंतर, होम नर्सिंग इत्यादी नवीन विषय लिखाणात यायला हवेत.
२. किरकोळ आजार, किरकोळ उपचार, घरी घ्यायची काळजी इ.
३. प्रतिबंधक आणि खबरदारीचे उपाय आणि उपचार – प्रिव्हेन्शन्स आणि प्रिकॉशन्स.
४. ॲक्सिडेंटस्, हार्टअॅटॅक, इन्फेक्शन्स, कॉम्प्लिकेशन्स इ.
५. बेसिक मेडिकल सायन्सेस – ॲनॉटॉमी, फिजिऑलॉजी, नर्सिंग इ.
६. वर्तणुकीच्या समस्या – बिहेविरल प्रॉब्लेम – राग, डिप्रेशन्स, तोडून बोलणं इ.
७. वैद्यकीय ललितसाहित्य – डॉक्टरी सत्यकथा, वैद्यकीय विज्ञान कथा, सोलेस स्टोरीज इ.

**७. वैद्यकीय लिखाणाचा काय उपयोग होईल?**

वैद्यकीय लिखाणाचा पेशंटना खूप उपयोग होईल. त्यातील प्रमुख उपयोग म्हणजे –

१. लोकांना आजाराची माहिती मिळेल. त्यामुळे समजूनउमजून उपचार होतील.
२. पेशंटची आजाराबद्दलची भीती कमी होईल.
३.. डॉक्टर-पेशंटचे संबंध सुधारतील.
४. वैद्यकीय व्यवसायातील भोंदूगिरी, अंधश्रद्धा कमी होतील.
५. वैद्यकीय व्यवसायातील बाजारीपणा कमी होईल.
६. लोकच विचारतील हे का आणि हे का नाही?
७. वैद्यकीय व्यवसायातील फसवाफसवी कमी होईल.
८. उपचार, फी, सोयी यात स्टॅंडर्डायझेशन येईल. नीतिनियम येतील.
९. मेडिकोलिगल प्रॉब्लेम्स कमी होतील.

**८. वैद्यकीय लिखाण कसं असावं?**

वैद्यकीय लिखाण शक्यतो –

१. गोष्टीरूप – लहान-लहान सोपीसोपी वाक्यं, अधिकाधिक चित्रं असलेलं, क्लिष्ट व

शब्दजंजाळ नसलेलं. लहान-लहान लेख असावेत.

२. लिखाणात रूढार्थाने असलेले इंग्लिश शब्द तसेच ठेवावेत. उदा. मलेरिया, टी. बी., एच. आय. व्ही, नवीन शब्दांच्यापुढे जुने इंग्लिश शब्द लिहावेत.

३. मुख्यत: लिखाणात माहितीचे भावानुकरण व्हावं – भाषांतर नको.

**९. वैद्यकीय लिखाणाचं भवितव्य आणि वाटचाल**

१. वाढत जाईल.

२. अधिकाधिक आणि नवीन नवीन विषय येतील.

३. प्रिंट मिडियापेक्षा ऑडियो-व्हिडीओ वाढेल.

४. एक भीती – आजच्या मेडिकल कॉलेजमधील बहुतांश विद्यार्थी हे कॉन्व्हेंटमधील असल्याने त्यांना मातृभाषेचं ज्ञान, आवड आणि आकलनही नाही. मातृभाषा समजत नाही आणि इंग्रजी येत नाही. त्यामुळे त्यांची विचारशक्ती, सृजनशीलता ही खुरचटत चालली आहे. त्यामुळे मराठीत या डॉक्टरांकडून किती लिखाण होईल ही एक भीतीच आहे.

५. आज मराठीमध्ये ओरिजनल-मूलभूत असं लिखाण नाही. संशोधन नाही. आजच्या लिखाणात फक्त माहिती आहे. इथपर्यंतच ते थांबलं आहे.

अधिकाधिक डॉक्टरांनी लिखाण केलं तर या माहितीचं रूपांतर ज्ञानात होईल. ज्ञानाचं रूपांतर केव्हातरी शहाणपणात म्हणजे विसडममध्ये होईल.

या सर्व वैद्यकीय लिखाणाच्या बाबतीत एक जर नियम ठेवला की, आपण लोकांना काहीतरी सांगतोय, शहाणं करून सोडतोय आणि हे करत असताना माझे मोठेपण विसरतोय हे लक्षात ठेवलं तर चांगलं कसदार वैद्यकीय लिखाण बाहेर येईल. कदाचित त्यावेळी आजचे समीक्षक त्याला साहित्य म्हणतील.

ज्ञानेश्वर माउलींच्याच शब्दात सांगायचं झालं तर वैद्यकीय लिखाणाचा एकमेव उद्देश लोकांना शहाणं करून सोडावं – त्यांचं ज्ञान वाढावं आणि अज्ञान दूर व्हावं हाच आहे.

माउलींनी हे साररूपाने खूप छान सांगितलं आहे.

***आपुलिया गुणे, पुढिलांचे उणे***
***फेडोनिया देणे तया लागी***

*– ज्ञानेश्वरी*

**–डॉ. अरविंद संगमनेरकर**
एम. डी., डी.जी.ओ., एफ.आय.सी.एस., एफ.आय. सी.ओजी.,
(स्त्रीरोग व प्रसूतिशास्त्रतज्ज्ञ), संपादक शतायुषी, कॉलनी नर्सिंग होम,
नवी पेठ, पुणे ३०.

❑



अनुक्रमणिका

# डॉ. वा. के. लेले यांचा अनुकरणयोग्य भाषाविचार



डॉ. द. दि. पुंडे

'भाषा : स्वरूप, सामर्थ्य व सौंदर्य' या पुस्तकाचे लेखक डॉ. वा. के. लेले हे मराठीचे नाणावलेले प्राध्यापक आणि वजनदार समीक्षक आहेत. त्याहीपेक्षा त्यांचे वर्णन 'एकलव्य निष्ठेचे व्रतस्थ अभ्यासक' असेच करणे योग्य होईल. भाषा मग ती संस्कृत, मराठी वा इंग्रजी कोणतीही असो; तिच्या मूळ स्वरूपाबद्दल आणि कार्याबद्दल डॉ. लेले यांच्या मनात एक आग्रहविरहित कुतूहल असते, असे दिसते आणि या आपल्या स्वाभाविक कुतूहलापोटीच डॉ. लेले त्या त्या भाषेचे स्वरूप, सामर्थ्य व सौंदर्य न्याहाळू लागतात, असेही दिसते. हे त्यांच्या संदर्भातले निरीक्षण त्यांच्या प्रस्तुत पुस्तकाच्या आधारेच मांडलेले आहे, असे नव्हे; तर 'राजहंस प्रकाशना'नेच या अगोदर प्रकाशित केलेले त्यांचे 'वाक्यकोश' हे पुस्तकही या संदर्भात लक्षात घेता येते. 'वाक्यकोश' मध्ये डॉ. लेले यांनी इंग्रजीबरोबरच मराठी भाषेतील वाक्यरचना शैलीदृष्ट्या सौष्ठवपूर्ण व सार्थ कशी असेल, याचे संकेत दिलेले आहेत.

प्रस्तुत 'भाषा : स्वरूप, सामर्थ्य व सौंदर्य' या पुस्तकात एकूण सहा निबंध-लेख आहेत. या सहाही लेखांची विषयसूत्रे वेगवेगळी आहेत, हे खरे आहे; पण हे सारे निबंध भाषाविचाराच्या मूलभूत अशा एकाच आशयसूत्राने एकत्र बांधले गेल्यासारखेच आहेत. उदाहरणार्थ, भाषाशुद्धी व जुन्या मराठी शब्दांचे पुनरुज्जीवन यांविषयीचे लेख भाषास्वरूपाचीच चर्चा करणारे आहेत, तर 'ललित साहित्याची भाषा' व 'वाग्वैजयंतीची भाषा' हे लेख एकाच वेळी भाषेचे सामर्थ्य आणि तिचे सौंदर्य यांचा विचार करणारे आहेत. 'संभाषणाची भाषा' व 'भाषांतर' हे दोन्ही लेखही असेच भाषेचे अंगभूत सामर्थ्य व शैलीगत सौंदर्य यांसंबंधाने बराच काही ऊहापोह करणारे आहेत. खरे तर या पुस्तकातील प्रत्येक लेख भाषेच्या स्वरूपाबद्दल, सामर्थ्याबद्दल आणि सौंदर्याबद्दल काही ना काही विचार मांडणारा आहे. त्यामुळे पुस्तकासाठी योजिलेले 'भाषा : स्वरूप, सामर्थ्य व सौंदर्य' हे शीर्षक यादृच्छिक नसून यथार्थवाचकच आहे.

पुस्तकातील पहिलाच लेख 'सावरकर आणि भाषाशुद्धी' हा आहे. स्वातंत्र्यवीर सावरकरांनी १९३७ साली मराठी भाषेच्या शुद्धिसंदर्भात एक प्रक्षोभक व्याख्यान दिले होते. त्यासंबंधाने तेव्हापासून आजपर्यंत पुन:पुन्हा विचारमंथन होते आहेच. डॉ. लेले यांनी त्यासंदर्भात येथे



अनुक्रमणिका






केलेले मतप्रदर्शन हे वस्तुनिष्ठ आणि मुख्यत: 'भाषा ही एक सामाजिक संस्था असून तिचे नियंत्रण समाजाकडून होते; बाह्य आदेशानी नव्हे' या विचारसूत्रास धरून आहे. स्वातंत्र्यवीर सावरकरांच्या भाषणातील गाजलेला, बहुचर्चित मुद्दा होता परकीय भाषांतील शब्द हद्दपार करून त्याऐवजी संस्कृत (गीर्वाण) शब्द (– पाहिजे तेथे मुद्दाम तयार करून) वापरण्याबाबतचा. सावरकरांच्या या आदेशाचा विचार डॉ. लेले भाषेच्या सामाजिक उपयोगितेच्या दृष्टीने करतात आणि असा आदेश ''मराठी भाषेच्या अंगवळणी पडण्याजोगा नाही'' असे आपले नि:संदिग्ध निरीक्षण सप्रमाण नोंदवितात. मराठी भाषेत मुळातच असलेल्या शब्दांऐवजी उगाचच परभाषांतील (अर्थातच उर्दू, फारसी व इंग्रजीतील) शब्द वापरण्याच्या वृत्तीला स्वातंत्र्यवीर सावरकर 'पराभवाची स्मारके' मानतात. डॉ. लेले याला 'अप्रगल्भ किंवा उथळ मनोवृत्तीची लक्षणे' मानतात. डॉ. लेले यांचा हा दृष्टिकोन मुद्दाम लक्ष द्यावा असा विधायक आहे. कारण भाषेच्या स्वरूपाचा संबंध ते राजकारणाशी जोडू इच्छित नाहीत. वास्तविक राज्यकर्त्यांचा दबाव भाषेच्या वर्तनसंकेतांवर येतो आणि त्यामुळे भाषिक परिवर्तने होत राहतात, हे एक भाषाभ्यासक म्हणून डॉ. लेले यांना माहितीच आहे. तथापि प्रजेच्या अप्रगल्भपणामुळे किंवा उथळपणामुळेही राज्यकर्त्यांचे फावते, (खरे तर प्रजेची अप्रगल्भ, उथळ वृत्तीच परकीय राजवट येण्यास व स्थिर होण्यास कारणीभूत असते), राज्यकर्त्यांनी आदेश न काढताच त्यांचे हेतू सिद्धीस जातात, हा भारताचा सातशे वर्षांचा इतिहास डॉ. लेले यांना चांगला ज्ञात आहे. आपल्याला हेही माहिती आहे की सावरकरांच्या प्रत्येक सामाजिक, ललित व अन्य लेखनामागे त्यांचा राष्ट्र-निर्माणक, राष्ट्र-संवर्धक, राष्ट्रीय अस्मिता-प्रवर्तक असा जाज्वल्य विचारच असतो. भाषाशुद्धीसंदर्भातही सावरकरांचे मुख्य ध्येय आहे, ते राष्ट्रीय अस्मिता जपण्याचे, परक्या राजवटींच्या परिणाम-अवशेषांचे उच्चाटण करण्याचे. सावरकर-लेले यांच्या भाषाविचारविषयक भूमिकांमध्ये असा फरक आहे. तथापि डॉ. वा. के. लेले सावरकर-विचाराशी अजिबातच सहमत नाहीत असे नव्हे. उलट पाश्चात्त्यांनी (आपल्या राष्ट्रापाठोपाठच) आपल्या संस्कृतीवर कब्जा मिळविल्यामुळे आपली संस्कृती, आपले राष्ट्र मृत्युपंथास तर लागणार नाहीना, ही सावरकरांना संत्रस्त करणारी समस्या डॉ. लेले यांना 'मन:कोषात जतन करून ठेवण्याच्या' योग्यतेची वाटते. पण भाषाशुद्धिसंदर्भातला कडवेपणा मात्र डॉ. लेले स्वीकारू शकत नाहीत. कारण त्यांचे सद्य:कालीन भाषा-वर्तनाचे आकलन वस्तुस्थितीच्या जमिनीवर पाय घट्ट रोवून केलेले आहे. या लेखाच्या अखेरीस डॉ. लेले यांनी जो निष्कर्ष काढलेला आहे तो अगदी अधोरेखित करण्यासारखा आहे. कारण सध्याच्या वेगवान जागतिकीकरणाच्या प्रक्रियेशी तो सुसंगत आहे. डॉ. लेले म्हणतात, ''सध्याच्या काळात जगातील भिन्न भाषक अनेक कारणांमुळे एकमेकांच्या जवळ वारंवार येत आहेत; त्यामुळे वेगवेगळ्या भाषांची देवाण-घेवाण नि:संकोचपणे होत आहे आणि तशी ती भविष्यकाळातही होत राहणार आहे. ही स्थिती अटळ आहे, हे ध्यानात घेऊन भाषाशुद्धीच्या प्रश्नाकडे समतोलपणे पाहावयास हवे.''

या पुस्तकातील 'संभाषणाची भाषा : स्वरूप व वैशिष्ट्ये' या लेखाचे वर्णन "सद्य:परिस्थितीत अत्यंत उपयुक्त लेख" असे करावे लागेल. कारण मराठीच्या संभाषणांची आजकाल अगदी रयाच गेल्यासारखी सद्य:परिस्थिती आपल्या अवतीभोवती आहे. वास्तविक भाषेचा जन्मच (लेखनाकरिता नव्हे तर) संभाषणाकरिता झालेला आहे. तरीही बहुतांश लोकांच्या बाबतीत संभाषण ही एक असाध्य कला (किंवा पाहिजे तर असाध्य शास्त्र म्हणा) असते आणि ते या कलेपासून/शास्त्रापासून दूर राहणेच पसंत करतात. डॉ. लेले यांचा हा लेख अशा लोकांची 'संभाषणा'विषयीची भीती व अप्रीती दूर करणारा आहे. कारण लेखक येथे केवळ संभाषणाची व्याख्या व स्वरूपवैशिष्ट्ये सांगून गप्प राहत नाहीत, तर ते संभाषणविद्या अवगत करण्याच्या नानाविध रीती सोदाहरण समजावून देतात. येथे त्यांनी संभाषणातील स्वाभाविकता, अपूर्णता, पूरकता, प्रतिसाद, पुनरुच्चार, प्रश्नोत्तररूपता, ग्राम्यता, अशुद्धता, खंडितता, संक्षिप्तता, स्वैरता, भाषाबाह्यता, चिंतनशीलता इत्यादी संभाषणास मारक-तारक गोष्टींचा दाखल्यांसह विचार केलेला आहे. संभाषण-कला की शास्त्र, या जंजाळात न गुंतता डॉ. लेले "संभाषणातील भाषा ही सर्वत्र वापरली जाणारी भाषा असते" हीच एक गोष्ट आवर्जून सांगतात व ठसवितात. याच दृष्टीने ते आपल्या असे निदर्शनास आणतात की "संभाषणात कोणत्याही वयाच्या, लिंगाच्या, जातीच्या, धर्माच्या व व्यवसायाच्या व्यक्ती भाग घेऊ शकतात." संभाषण हे व्यक्तीच्या भाषिक व्यवहाराचे 'अनिवार्य व यशस्वी साधन' असल्याचे सांगून उत्तम संभाषणपटू होण्याकरिता संभाषणाची अनेकानेक शक्तिसामर्थ्ये ही आत्मसात करायलाच हवीत, हे डॉ. लेले येथे आग्रहाने प्रतिपादन करतात. डॉ. लेले यांनी या लेखात सूचित केलेले भाषिक-संकेत युवावर्गाने आत्मसात केले तर उद्याच्या बोली-मराठीची फार चिंता करावी लागणार नाही.

डॉ. लेले प्रत्येक विषयाचा कसा शास्त्रशुद्ध आणि मुख्य म्हणजे क्रमविकासी अभ्यास सुचवीत जातात याचे उदाहरण म्हणून 'ललित साहित्याची भाषा' या त्यांच्या लेखाच्या आरंभी-आरंभीच येणारे विवेचन पाहावे. ते लिहितात, 'मनुष्य स्वनिर्मित भाषेच्या साहाय्याने विचार करणे, बोलणे, ऐकणे, लिहिणे वा वाचणे अशी पाच कार्ये साधतो. ह्यांपैकी विचार करणे हे कार्य इतर चारी कार्यांच्या मुळाशी असते. बोलणे व ऐकणे ही मानवी भाषेची प्रधान कार्ये असून लिहिणे व वाचणे ही सापेक्षतया गौण कार्ये होत. मनुष्य आपल्या विविध मनोगतांच्या प्रकटीकरणासाठी अनेकदा भाषेच्या 'लेखी' रूपाचा अवलंब करतो. ललित लेखन हा भाषेच्या लेखी रूपाचाच एक विशिष्ट प्रकार आहे.' ललित लेखन म्हणजेच ललित कृती ही एक स्वायत्त स्वतंत्र घटना आहे, असे नेहमी म्हटले जाते. परंतु मनोगतांच्या प्रकटीकरणासाठी उपयोजिलेले भाषेचे लेखी रूप ही ललित कृतीची मूळ आधार-भूमी आहे, याकडेच जणू डॉ. लेले येथे अंगुलिनिर्देश करीत आहेत. असे म्हणण्याचे कारण असे की, भाषा-द्रव्य हाच ललित साहित्याचा मूलाधार आहे आणि मूलभूत आश्रयदेखील आहे. लेखकास जो अनुभव व्यक्त करावयाचा असतो तो कितीही अनामिक आणि कितीही

भाषातीत असा असला तरी लेखकास तो 'सामाजिकां'समोर अभिव्यक्त करताना त्या अनुभवास या ना त्या पद्धतीचे 'भाषिक' रूप हे द्यावेच लागते. तेथेच ललित साहित्यासाठीच्या भाषेचे असाधारणत्व व विशिष्टत्व जन्म घेते. कारण नेहमीची व्यवहारसुलभ (केशवसुतांच्या दृष्टीने गद्यग्रथित जगाच्या) भाषा-संरचनेने अपेक्षित कार्य साधता येणारे नसते. पण लेखकाच्या हाती व्यवहारसुलभ भाषेचेच द्रव्य असते. आपला अनुभव व्यक्त करण्यासाठी त्याला त्या द्रव्याचे एक परिवर्तित रूप सिद्ध करावे लागते. डॉ. लेले यांनी असे परिवर्तित रूप सिद्ध करण्याच्या दहा प्रक्रिया येथे सुचविलेल्या आहेत. (त्या आणि तेवढ्याच प्रक्रिया भाषेचे परिवर्तित रूप सिद्ध करण्यासाठी उपयुक्त होत, असा डॉ. लेले यांचा दावा नसणारच.) उदयोन्मुख लेखकांनी त्यांचे मननचिंतन केल्यास त्यांना खूप काही लाभ निश्चित होईल.

कै. राम गणेश गडकरी ऊर्फ गोविंदाग्रज यांच्या 'वाग्वैजयंती'च्या भाषेची पाहणी करणारा येथील लेख अनेक कारणांसाठी महत्त्व धारण करतो. पहिली गोष्ट म्हणजे कवितेची भाषा ही अन्य साहित्यप्रकारांच्या भाषेपेक्षा वैशिष्ट्यपूर्ण असते काय, हा प्रश्न येथे आरंभीच उपस्थित करून त्याचे एक समाधानकारक उत्तरही दिलेले आहे. (डॉ. लेले हे शैलीशास्त्रज्ञ असून शैलीविज्ञानावरचा त्यांचा एक ग्रंथही आहे, हे येथे आठवावे.) कवी भाषेची, भाषेतील शब्दांची आणि मुख्य म्हणजे भाषाशक्तींचीही निवड करीत असतो; त्याची ही निवड (जाणिवेच्या पातळीवरची असो वा नेणिवेवरच्या असो) सहेतुक असते; (कै. ग. त्र्यं. मालखोलकरांचा शब्दप्रयोग वापरून असे म्हणता येते की ती 'हेतुसुंदर' असते.); कवी एक भाषिक मांडणी किंवा संरचना करीत असतो, इत्यादी प्रकारच्या काव्यभाषाविषयक निदानांची चर्चा होण्याकरिता उपयुक्त असे द्रव्य डॉ. लेले यांच्या या लेखातून उपलब्ध होते. या लेखात डॉ. लेले यांनी एक विलक्षण मुद्दा मांडलेला आहे. तो म्हणजे, गोविंदाग्रजांसारखे काही मनस्वी कवी काही शब्द जाणून-बुजून टाळत-वगळत असतात. डॉ. लेले यांचे हे निरीक्षण खासच म्हणायला हवे. ते अतीव महत्त्वाचेही आहे. कवीचे भाषिक आणि सौंदर्यदृष्ट्यात्म बळ आजमावण्याचा हा एक चांगला निकष होय. कारण कवी कोणते शब्दप्रयोग करतो याप्रमाणेच तो कोणते शब्दप्रयोग बाजूला सारतो, याकडेही लक्ष पुरविले असता कवितेचे सौंदर्य कळत जाते. कारण कविता ही अखेरतः एक सौंदर्यविधान असते. साहजिकच सौंदर्यविधानास हानी पोहोचविणारे शब्द बाजूला ठेवणे हे कवीचे कर्तव्यच ठरते. अर्थातच असे शब्द कोणते, हे ती-ती कविता कशा स्वरूपाचे सौंदर्यविधान आहे यावरूनच ठरत असणार. एका कवितेच्या सौंदर्यास हानी पोहोचविणारा शब्द दुसऱ्या एखाद्या कवितेच्या बाबतीत सौंदर्यसंवर्धक असू शकेल. या लेखाच्या अखेरीस डब्ल्यू नोवाटनी यांचा हवाला देऊन डॉ. लेले यांनी कवितेची भाषा म्हणजे भाषेमध्ये मुळात सुप्त असणाऱ्या सौंदर्याभिव्यक्तीच्या अनेकानेक शक्यतांची एक मनोज्ञ आंतरक्रियाच होय, या निष्कर्षाकडे आपले लक्ष्य वेधून घेतले आहे.

मराठी भाषेच्या दुःस्थितीबद्दल नेहमीच लिहिले-बोलले जाते; परंतु मराठी भाषा सशक्त

कशी होईल, तिच्या सबलीकरणाचे उपाय कोणते असू शकतात, यांबाबत क्वचितच लिहिले-बोलले जाते. डॉ. लेले यांनी अशी उपाययोजना सुचविणारा 'जुन्या मराठी शब्दांचे पुनरुज्जीवन' हा लेख लिहिलेला आहे. हा लेख भाषेबद्दलची त्यांची कशी विधायक व सकारात्मक दृष्टी आहे, हेच सांगणारा आहे. "आजची मराठी भाषा गुळगुळीत, निस्तेज व चैतन्यहीन तर होत चालली नाही ना?" ही अनेक मराठी भाषाप्रेमी विचारवंतांना सतावणारी समस्याच या लेखाच्या मुळाशी आहे आणि या समस्येवर एक आचरणयोग्य अशी निश्चित उपाययोजना म्हणून डॉ. लेले अर्थसघन अशा जुन्या मराठी शब्दांच्या पुनरुज्जीवनाचा मार्ग सुचवितात. ते केवळ तार्किक पातळीवर असा मार्ग सुचवीत नाहीत, तर अशा ३०० हून अधिक शब्दांची सार्थ स्पष्टीकरणात्मक सूचीही देतात. (हे जुने, सध्या वापरात नसलेले शब्द स्वत:ला कोठून उपलब्ध झाले याचीही माहिती लगेच त्या त्या शब्दासमोर कंसात देण्यास लेलेसर विसरत नाहीत, हेही येथेच अधोरेखित करणे गरजेचे वाटते.) या सूचीवरून आपल्याला हे जाणवते की, डॉ. लेले जो उपाय सुचवितात तो उपाय म्हणजे त्यांना सुचलेली एक शक्कल नव्हे, तर त्यांना मराठी भाषेच्या अर्थवाहकतेबद्दल वाटणारा एक विश्वास आहे. आपल्या भाषेबद्दल त्यांना काही आस्था आहे, काही कळकळ आहे म्हणूनच ते अर्थासहित जुन्या शब्दांचा थोरला पसारा मराठी लोकांसमोर उपयोजनासाठी ठेवीत आहेत. त्यांनी जुने शब्द पुन्हा एकवार वापरात आणण्याचा सुचविलेला उपाय प्रतिभासंपन्न लेखकांनी, प्रभावी वक्त्यांनी, जनहितदक्ष विचारवंतांनी आणि यशस्वी अध्यापकांनी मुद्दाम अवलंबून पाहावा, असे सुचवावेसे वाटते. कारण अर्थगर्भ जुन्या शब्दांच्या वापराने मराठी भाषेला 'नव्हाळी' प्राप्त होईल आणि त्याचबरोबर इंग्रजी-हिंदी शब्दांची उसनवारीही थोपविण्यास मदत होईल. खरोखर मराठी भाषेच्या जुन्या 'फडताळा'त आणि अंधाऱ्या 'बळदा'त असे अनेक शब्द पडून आहेत की जे बाहेर काढून वापरायला सुरुवात केली तर मराठी भाषा 'निसळून' (म्हणजे उजळून) निघेल. डॉ. लेले यांचा हा लेख पुस्तकात न राहता प्रत्यक्ष उपयोजनात यायला हवा असे मनापासून वाटते.

भाषा या घटनेकडे गांभीर्याने पाहणारे विचारवंत कळत-नकळत भाषांतराच्या प्रक्रियेचा विचार हा करतातच आणि डॉ. लेलेही याला अपवाद नाहीत. आपल्या येथील भाषांतरविषयक लेखात लेलेसरांनी भाषांतराच्या समस्या आणि त्यासंबंधातील उपाय यांचा विचार केलेला आहे. भाषांतर या प्रक्रियेच्या अंगभूत अशा काही समस्या आहेतच, पण त्याशिवाय आणखी काही समस्या अजाण, अपरिपक्व किंवा उत्साही भाषांतरकारांमुळेही निर्माण होताना दिसतात. म्हणूनच डॉ. लेले सर्वप्रथम 'भाषांतरकाराची योग्यता व पूर्वतयारी' हा मुद्दा विचारासाठी घेतात. 'शब्दार्थविवेक' आणि स्रोतभाषेचा तसेच लक्ष्य भाषेचा 'व्याकरणविचार' हे दोन भाषांतराच्या संदर्भातील अगदी कळीचे मुद्दे होत. त्यांचा यथोचित ऊहापोह डॉक्टर लेले न विसरता करतात. आज जागतिकीकरणामुळे आणि माहितीविज्ञानाच्या अतिवेगवान रेट्यामुळेही भाषांतर ही भाषिक घटना, आपली इच्छा असो वा नसो, आपल्या दैनंदिन जीवनाशीच



अनुक्रमणिका






बांधली गेलेली आहे. त्यामुळे केवळ व्यावसायिक भाषांतरकर्त्यासाठीच नव्हे, तर सर्वसामान्य नागरिकांसाठीही लेलेसरांनी येथे दिग्दर्शित केलेली भाषांतरविषयक पथ्ये नि तत्त्वे उपयुक्त ठरतील.

या पुस्तकातील प्रत्येक लेख मराठी भाषेचे स्वरूप, सामर्थ्य व सौंदर्य यांविषयी काही ना काही नवसूचन व उपयुक्त मार्गदर्शन करणारा आहे. डॉ. वा. के. लेले यांच्या व्यासंगाचा विषय वास्तविक 'वाङ्मयतत्त्वविवेचन' हा आहे. आपल्या नेहमीच्या व्यासंगाचा हा विषय बाजूला ठेवून लेलेसर मराठी भाषेच्या समृद्धीच्या विचारांकडे अंतर्यामीच्या काही एक आस्थेने, कळकळीने वळतात, हे विशेषच म्हणायला हवे. त्यामुळेच मराठी भाषेचे स्वरूपसौष्ठव वाढीस लागावे, ती सामर्थ्यसंपन्न व्हावी आणि तिचे सर्वांग सौंदर्याने बहरावे यांकरिता डॉ. वा. के. लेले यांनी केलेले मार्गदर्शन मराठी भाषकांना शिरसावंद्य व्हायला हवे.

**भाषा : स्वरूप, सामर्थ्य व सौंदर्य**
लेखक – डॉ. वा. के. लेले
राजहंस प्रकाशन, पुणे; मार्च २००५,
पृष्ठे ६ + ९६; मूल्य ८० रुपये.

**द. दि. पुंडे**
४/९ अर्चनानगर, एरंडवन,पुणे ४११०३८.

---

## साभार पोच

**समर्पक :** वैजयंती मोने, नीहारा प्रकाशन, पुणे, पृष्ठ ६४
**खेड्याकडे चला (एकांकिका) :** कृष्णा भोय, नीहारा प्रकाशन, पुणे, पृष्ठ ४८
**वाहीन बिल्वदले :** अनिता लिमये, नीहारा प्रकाशन, पुणे, पृष्ठ ३२
**मी फुलराणी :** भारती चव्हाण, नीहारा प्रकाशन, पुणे, पृष्ठ ३२
**मन्नूची गोष्ट :** स्नेहसुधा कुलकर्णी, पालवी प्रकाशन पुणे, पृष्ठ ३२
**एक्कावन्न योगासने (शालेय विद्यार्थ्यांसाठी) :** कृष्णा भोय, पालवी प्रकाशन पुणे, पृष्ठ ६४
**असं कां? :** अनिल लचके, पालवी प्रकाशन, पुणे, पृष्ठ ६४
**अनोखा परिचय ऋग्वेदाचा :** रघुनाथ दत्तात्रय जोशी, प्रकाशक वसुधा रघुनाथ जोशी (खेड, रत्नागिरी), पृष्ठ २१६
**चौरंगी :** आशुतोष उकिडवे, आरती प्रकाशन, डोंबिवली, पृष्ठ १५२
**अराऊंड द वर्ल्ड :** जयप्रकाश प्रधान, आरती प्रकाशन, डोंबिवली, पृष्ठ २९०
**चिंतनिका :** भास्करराव चव्हाण, वीणा प्रकाशन, जळगाव, पृष्ठ ३२
**आहुती :** भास्करराव चव्हाण, वीणा प्रकाशन, जळगाव, पृष्ठ २८
**शरणागतांचे स्तोम :** शशिकांत शिंदे, मानसी प्रकाशन, कोल्हापूर, पृष्ठ ८०
**पाण्याचा शोध व व्यवस्थापन :** एम. जी. देशपांडे, प्रकाशक आरती देशपांडे, पृष्ठ १०८



अनुक्रमणिका







# ज्ञानेश्वर हे विज्ञानेश्वरही आहेत



**डॉ. मधुसूदन बोपर्डीकर**

'चांगदेवपासष्टी' हा श्री ज्ञानेश्वरमाउलींचा वैशिष्ट्यपूर्ण ग्रंथ आहे. फक्त ६५ ओव्यांचा हा ग्रंथराज अल्पाक्षररमणीय परंतु आशयघन आहे. ज्ञानेश्वरी किंवा भावार्थदीपिका या ग्रंथाप्रमाणे किंवा हरिपाठ आणि स्फुट अभंगरचनेप्रमाणे चांगदेवपासष्टी व अनुभवामृत हे ग्रंथ सर्वसामान्यांपासून दूरचे राहिले आहेत. वास्तविक श्री ज्ञानदेवांचे विभूतिमत्व आणि त्यांचा चिद्विलासवाद हा मूलभूत व जागतिक तत्त्वज्ञानाच्या इतिहासातील प्रमुख सिद्धांत समजण्यासाठी या दोन ग्रंथांचे अध्ययन, संशोधन अधिकाधिक व्हायला हवे आणि त्याचा सर्वदूर प्रसार व्हायला हवा. तरच विश्वमाउली श्री ज्ञानदेवांचे तत्त्वज्ञ आणि वैज्ञानिक म्हणून अलौकिक महत्त्व जगाला ज्ञात होणार आहे. त्यादृष्टीने अलीकडे झालेल्या अभ्यासाचा मागोवा या लेखात घेण्याचा प्रयत्न आहे.

### मराठीतील पहिले उपनिषद्

चांगदेवपासष्टीचे महत्त्व मराठीतील पहिले उपनिषद् किंवा ईशोपनिषद् असे थोडक्यात सांगता येईल. भारतीय अद्वैत तत्त्वज्ञानाचे सारस्वरूप, सूत्रात्मक, संवादात्मक तेजस्वी उत्स्फूर्त, विश्वात्मक अनुभूती देणारे मंत्रवाङ्मय असे या छोटेखानी ग्रंथाचे स्वरूप पाश्चात्त्य तत्त्वज्ञ शॉपेनहॉवर यांनी सांगितले आहे. ज्ञानेश्वरी ही ३२००० ओव्यांची गीतेवरील रसाळ टीका विश्वमान्य अशीच आहे. ज्ञानदेवांची अभंगरचना सर्वसामान्यांना सुलभ शक्तिमार्गावरून परमतत्त्वाकडे नेणारी आहे. अनुभवामृत म्हणजे श्री ज्ञानदेवांनी स्वत: घेतलेल्या एकत्वाच्या, चैतन्यशक्तीच्या चिद्विलासाच्या अनुभवाचा अमृतकलश आहे, ज्ञानेश्वरीत अनेक संवाद आहेत, अनुभवामृत हा स्वत: स्वत:शी केलेला संवाद आहे. तर चांगदेव पासष्टीमध्ये बालयोगी ज्ञानेश्वर व महायोगी चांगदेव यांचा आत्मसंवाद आहे. थोडक्यात चांगदेवपासष्टी हे थेंबातील आकाश आहे.

### चांगदेवपासष्टीतील अध्यात्म

भारतीय अध्यात्म साररूपाने प्रकट करणारा हा ग्रंथ आहे. **ॐ पूर्णमद: पूर्णमिदं पूर्णात् पूर्णमुदच्यते । पूर्णस्य पूर्णमादाय पूर्णमेवावशिष्यते ।।** हा ईशावास्योपनिषदातील मंत्र व इतर १८ मंत्र म्हणजे भारतीय अध्यात्माचे नाभिकमल असून त्यातूनच ब्रह्म व सृष्टी










निर्माण झाली. या पूर्णमद: चा पूर्णोद्गार म्हणजे चांगदेवपासष्टी होय. वरकरणी ज्ञानदेव व चांगदेव यांच्यामधील हा संवाद असला तरी प्रत्यक्षात तो दोन आत्म्यांचा (खरे तर एकाच आत्म्याचा) हा स्वसंवाद आहे. चांगदेवांचे कोरे पत्र आणि ज्ञानदेवांच्या ६५ ओव्या म्हणजे 'मौनाची अक्षरे भली' अशाच स्वरूपाच्या आहेत. एकत्वामुळे हा संवाद म्हणता येत नाही. ही तर संवादापुढची अपरोक्षानुभूती आहे. ही एक सिद्धभेट आहे. या ग्रंथाला 'स्वस्ति श्री वटेशोपनिषद्' हेच नाव शोभून दिसेल.

### तत्त्वज्ञानाचे मूलसूत्र

तत्त्वमसि । (तत् त्वम् असि।) या औपनिषद् महावाक्याचे संपूर्ण विवेचन पहिल्या ३६ ओव्यांत त्वम् (तू जीवात्मा) हे विवेचन नंतरच्या २४ ओव्यांत आले असून शेवटच्या ४ ओव्या असि (ते तू आहेस) हे स्पष्ट करतात. जीवात्मा व परमात्मा यांचे स्वरूपकथन व त्यांची एकात्मता हाच या ग्रंथाचा एकमेव विषय आहे. 'तया पुत्र तू वटेश्वराचा' (ओवी ३७) 'तू वटेश्वराचा पुत्र आहेस', म्हणजेच जीवात्मा व परमात्मा एकच आहे. हा उल्लेख या दृष्टीने महत्त्वाचा आहे. वेगळ्या तऱ्हेने सांगायचे तर पहिल्या ३६ ओव्या 'अद्वैत कळलं' असे सांगणाऱ्या तर उत्तरार्ध 'वळलं का?' असे विचारणाऱ्या आहेत. सारांश, अनुभवामृत आणि चांगदेवपासष्टी हे ग्रंथ पराकोटीचे, निकाराचे एकत्व आणि केवल चैतन्याचे अस्तित्व सांगणारे आणि चिद्विलासावादाचा उद्घोष करणारे आहेत. 'तत्वमसि । अहं ब्रह्मास्मि । सर्वं खल्विदं ब्रह्म ।' याचाच अनुवाद म्हणजे 'आपणिया आपण भेटी । आपणामाजी ।' (ओ. ५७) ही ओवी होय. मुळात चांगदेव हा डोळा नसलेला आरसा होता. ज्ञानदेवांच्या भेटीनंतर तो डोळा असलेला आरसा (डोळस आरसा) झाला, चांगदेव ज्ञानदेव झाला. हेच अतूट एकत्व होय. ज्ञानेश्वरीत अवघड विषय सोपा करण्यासाठी उपमा-श्लेष-कोंदाकोंदी आहे. दृष्टान्त व प्रतिमानांना अंत नाही. चांगदेव पासष्टीमध्ये 'जीव-शिव ऐक्यभाव' सांगण्यासाठी काही व्यावहारिक दृष्टांत आले असले तरी ज्ञानदेव-चांगदेव-संवाद, हाच एक मूलभूत दृष्टांत आलेला आहे.

### अध्यात्म आणि विज्ञान

भारतीय तत्त्वज्ञानाची परंपरा हजारो वर्षांची आहे. उलट आधुनिक विज्ञानाचा आरंभ काही शतकांपूर्वी झाला. विज्ञान आणि अध्यात्म एकाच मूलतत्त्वाच्या शोधात असले तरी त्यांची संशोधन पद्धती भिन्न आहे. वैज्ञानिक वस्तुनिष्ठ तर तत्त्वचिंतक व्यक्तिनिष्ठ पद्धतीने शोध घेतलेला असतो. विज्ञान experiment तर अध्यात्म experience ला प्राधान्य देते, परंतु नवविज्ञानाची आधुनिक विचारधारा पाहता प्रयोगांची जागा अनुभूती घेत असल्याचे ध्यानात येईल. अध्यात्म व विज्ञान यांच्यामधील भिंती कोसळून पडत आहेत. जीव-शिव-ऐक्य (Unito Mystica) हेच आत मानवी जिज्ञासेचे ध्येय झाले आहे.

गेल्या काही वर्षांतील आधुनिक विज्ञानाच्या विचारांची दिशा पाहता, न्यूटनचा गुरुत्वाकर्षण

सिद्धान्त, आईनस्टाईनचा सापेक्षतावाद आणि प्लांक आणि इतरांचा पुंजवाद (Quantum Theory) अध्यात्माच्या, अनुभूतीच्या दिशेने वाटचाल करीत असल्याचे दिसते. प्रत्यक्ष व प्रयोगसिद्ध तेवढेच सत्य असे म्हणणारे वैज्ञानिक विश्वाच्या मुळाशी असणाऱ्या सूक्ष्मतम घटकांचा अनुभूतीच्या स्तरावर वेध घेऊ लागले आहेत. विश्वात जे दिसते तेवढेच असते असे नव्हे, आणि म्हणून विश्वात जे दिसत नाही ते नसतेच असे नाही. या निष्कर्षाप्रत आधुनिक वैज्ञानिक आले आहेत. ज्ञानेश्वरही ६४ व्या ओवीत म्हणतात.

*नाही तेचि काय नेणो असे । दिसे तेचि कैसे नेणो दिसे ।*
*असे तेचि नेणो, आपैसे । ते की होईजे ।।*

## विश्वोत्पत्ती व विश्वदर्शन

विज्ञान व अध्यात्म यांचा ध्रुवतारा विश्वोत्पत्ती व विश्वदर्शन (Perception) हाच आहे. १९८४ चा मूळ पान ५ विचार चिंतनीय आहेत. ते म्हणतात – याबाबतीत भारतीय तत्त्वज्ञानातील विचार अंतिम आणि परिपूर्ण आहेत. आजचे विज्ञान जे सांगते, तेच ज्ञानेश्वरांनी ७०० वर्षांपूर्वी सांगून ठेवले आहे. त्यादृष्टीने चांगदेव-पासष्टी व नवविज्ञान यांच्यामधील वैचारिक साम्य आश्र्यर्चकारक आहे.

१) नवविज्ञान चेतनाशक्ती (Consciousness) विश्वाचे मूळ मानते. तसेच विश्व अखंड आहे, हेही विज्ञानाला संमत आहे. चांगदेवपासष्टी ही केवळ ज्ञान, चैतन्य व विश्वाच्या अविच्छिन्न एकतेचा उद्‌घोष करते. याच चैतन्य विज्ञानाला महत्त्वपूर्ण योगदान दिल्याबद्दल या ग्रंथाचे इंदूरचे आंतरराष्ट्रीय ख्यातीचे तत्त्वज्ञ-शोधक लेखक श्री. प्रभाकर अडसूळ यांचा १९९२ मध्ये आंतरराष्ट्रीय गौरव करण्यात आला. आधुनिक विज्ञानात न्यूटनचे परमाणूंचे मूळ घटक घन-कण (Matter) मानले, नंतरच्या संशोधनात इलेक्ट्रॉन, प्रोटॉन व न्यूट्रॉनचे आगमन झाले. विद्युत्‌भारित कणांतून ऊर्जा व तिच्यातून घनकण निर्माण झाले. ही ऊर्जा कधी तरंगमय तर कधी कणमय दिसते. चांगदेवपासष्टीतील मूळ चैतन्य हेच होय. अंतराळ वैज्ञानिक (Cybernetic) डॉ. फॉस्टर, हे सर्व विश्व प्रज्ञेने व्यापले आहे असेच मानतात. सर्व निर्मिती प्रज्ञा व चैतन्याने व्यापिली आहे, असे ज्ञानेश्वरांनी ७०० वर्षांपूर्वीच सांगितले आहे. आधुनिक विज्ञान सत् आणि चित् ह्या दोनच मिती सांगून थांबते. उलट श्री ज्ञानेश्वरांनी आनंद ही नवीन मिती आधीच सांगून ठेवली आहे. त्यामुळे ज्ञानेश्वरांनी Quantum च्या पुढे जाऊन एक नवीनच चैतन्य-विज्ञान सांगितले आहे. म्हणूनच त्याला श्री. आडसूळ Post-Quantum Science म्हणतात.

हे चैतन्य किंवा प्रज्ञा किंवा आधुनिक ऊर्जा म्हणजे सर्व अस्तित्वाचा मूळ आधार आहे. हे चैतन्य स्वयंप्रेरक, प्रकाशक, प्रकाशमान, संघटक, स्वयंभू, निरपेक्ष व परिपूर्ण असते. त्या चैतन्याशी एकरूप होणे, जीवाशिवाची एकात्मता होणे (Unito Mystica) हेच विज्ञान व अध्यात्माचे अंतिम लक्ष्य आहे. क्वांटमप्रामाणे पूर्णत्वसुद्धा अनुभवावे लागते असे

हायजेनबर्ग म्हणतात. अॅटममधील इलेक्ट्रॉन कसा असतो, कसा संचार करतो? हे अनुभवावे लागते, प्रयोगाने सिद्ध करता येत नाही, असेही त्यांनी म्हटले आहे. अध्यात्मातील प्रज्ञा किंवा प्रीतीचा अनुभव याच पद्धतीने घ्यायचा असतो. या प्रक्रियेत निरीक्षकाचा सहभाग गरजेचा असतो. याचाच अर्थ द्रष्टा, दृश्य, दृष्टी ही त्रिपुटी उरत नसते..

**अठरावा हत्ती**

चैतन्यविज्ञानात प्रज्ञा ही १८ वा हत्ती असते. प्रज्ञा वैचारिक गोंधळातून बाहेर पडण्यासाठी कशी उपयुक्त ठरते, हे समजावे म्हणून पुराणात अठराव्या हत्तीची कथा आली आहे. एका राजाला ३ पुत्र असतात. त्याच्याकडे असलेल्या १७ हत्तींची वाटणी करण्याची त्याची योजना असते, ती अशी $^{१}/_{२}$ हत्ती (= $८^{१}/_{२}$) थोरल्या मुलाला, $^{१}/_{३}$ हत्ती (=$५^{२}/_{३}$) मधल्या मुलाला, तर $^{१}/_{९}$(=$१\ ^{८}/_{९}$) हत्ती धाकट्या मुलाला द्यायचे. प्रत्यक्षात हे कसे शक्य होणार! मुलांमध्ये युद्ध सुरू झाले. ते थांबविण्यासाठी जंगलातील शहाण्या माणसाने आपला १ हत्ती, १७ हत्तींजवळ उभा केला. त्यानुसार वाटणी केल्यावर मुलांना ९+६+२ = १७ हत्ती मिळाले. राजाची योजना सफल झाली. नंतर शहाणा आपल्या हत्तीवरून जंगलात निघून गेला. तेव्हा एकलं एक आत्मतत्त्व, चैतन्यशक्तीचे मूलभूत स्वरूप, विश्वाची अखंडता व चिद्विलासवाद समजण्यासाठी प्रज्ञा आवश्यक आहे. याप्रकारे १२ व्या शतकातील ज्ञानेश्वरांचे अध्यात्म व २० व्या शतकातील विज्ञान यांमधील साम्य पाहता श्री ज्ञानेश्वरांना A Looking Glass Scientist 'आदर्श दर्शनकार शास्त्रज्ञ' असे म्हणणे यथार्थ ठरेल.

---

**आधारग्रंथ** – Unito Mystica - डॉ. प्रभाकर अडसूळ
प्रकाशाची अक्षरे – स्व. डॉ. व दि. कुलकर्णी

**डॉ. मधुसूदन बोपर्डीकर**
चैतन्यनगर, भिस्तबाग रस्ता, अहमदनगर

❑

---

## साभार पोच

**कांशीराम (मनुवादापुढे आव्हान) :** सी. पी. थोरात, शिवम् प्रकाशन, पुणे, पृष्ठ ४८०
**वाळूच्या पात्रात मांडलेला खेळ :** अनुराधा पाटील, तुला प्रकाशन, औरंगाबाद, पृष्ठ ८८
**सूफी प्रार्थना किनाऱ्यावरून :** श्रीधर नांदेकर, तुला प्रकाशन, औरंगाबाद, पृष्ठ १३२
**तत्पुरुष :** कविता महाजन, तुला प्रकाशन, औरंगाबाद, पृष्ठ ११२
**भावलहरी :** श्रीकांत श्री. फडके, स्वत: लेखक प्रकाशक, पृष्ठ ९६
**ईश प्राण :** मीरा सुंदरराज, व्ही आर्टस् प्रकाशन, पृष्ठ ४४
**शब्द झुला :** नारायण थोरात, नीहारा प्रकाशन, पुणे, पृष्ठ ६४
**मराठीतून कबीर बोध :** शैला पिटकर, नीहारा प्रकाशन, पुणे, पृष्ठ १७६

अनुक्रमणिका

# स्मरणकप्प्यात गेलेले डॉ. मिरदेव गायकवाड



नंदा सुर्वे

कालपर्यंत आपल्याबरोबर असणारा माणूस एकदम संपूनच जातो, ही हादरा देणारी गोष्ट. आपल्याबरोबर चालणारा, बोलणारा डॉ. मिरदेव गायकवाड हा चैतन्यमय माणूस सर्व निकटवर्तीयांना चटका लावून गेला. त्यानी जगाचाच निरोप घेतल्याची बातमी आधी कानात शिरेना, नंतर मन स्वीकारेना. मनाला बसलेला हा हादरा भूकंपासारखाच होता.- सैरभैर करायला लावणारा. वयाच्या अवघ्या ५३ वर्षांत त्यांचा हा दमदमीत प्रवास संपून जातो आणि त्याचबरोबर एक स्नेहधर्मी, प्रसन्न, निर्मत्सरी असं व्यक्तिमत्त्व नाहीसं होतं, हे फार दु:खदायक. त्यांचं शेवटचं स्टेशन इतक्या लवकर, इतक्या झटपट, इतक्या वेगानं कसं आलं कोण जाणे! नियतीचा हा क्रूर हल्ला सोसणं भागच असतं.

डॉ. मिरदेव गायकवाड नावाचं व्यक्तिमत्त्व दोन वर्षांपूर्वी साहित्य परिषदेत पदाधिकारी म्हणून रुजू झालं. एक कार्योत्सुक माणूस परिषदेला लाभला असल्याच्या पाऊलखुणा सुरुवातीपासूनच उमटायला लागल्या. परिषदेच्या कामाची माहिती ते सहजप्रेरणेतून घेत गेले. स्वत:च्या खात्याची कामं ते चोखपणे पार पाडत गेले. ते पार पाडत असतानासुद्धा नवेपणातले दोष नाहीत, चुका नाहीत, कमतरता कसलीच नाही. प्रस्थापित कार्यकर्त्याच्या भूमिकेतून निर्वेधपणे कार्य सुरूच ठेवलं. या प्रवाहात स्वत:चं ठोस व्यक्तिमत्त्व उभं करण्याचा अभिनिवेश तर मुळीच नाही.

'ऐसी कळवळ्याची जाती; लाभावीण करी प्रीति' अशा धारणेतून ते कार्यरत राहिले. केवळ स्वत:च्याच कामात त्यांनी गुरफटून घेतलं असं नव्हे, तर परिषदेच्या सर्वांगीण कामांशी ते बांधील राहिले. एक सहकार्यशील सहकारी म्हणून त्यांची प्रतिमा आम्हां सहकाऱ्यांच्या मनात नेहमीच ठसठशीतपणे उभी राहील. 'जिथे कमी तिथे आम्ही' या सूत्रातून ते कुणाच्याही पाठीशी उभे राहात गेले.

आम्हां सर्वांना त्यांची कायमची आठवण राहील ती परिषदेच्या शताब्दी महोत्सवाच्या शुभारंभ कार्यक्रमाची. आपलं घरचं कार्य असल्याच्या भूमिकेतून त्यांनी या कामासाठी झोकून दिलं. मग काळाची, वेळेची कधी त्यांनी फिकीर केली नाही. परिपूर्णतेचा ध्यास असणाऱ्या माणसाला कामातली वजाई कशी खपणार? म्हणून मनाच्या तळवटीपासून त्यांनी स्वत:ला

कार्यमग्न ठेवलं. असा समर्पित कार्यकर्ता कोणत्याही सबबीखाली स्वत:ला अलिप्त करूच शकत नाही. परत हे सगळं प्रसन्न मुद्रेनं! स्वत: त्यातला आनंद वेचत इतरांच्याही ओंजळीत आनंदाची सुंदर, तेजस्वी, गंधाळ फुलं टाकून त्या ओंजळीला अर्थपूर्ण करणारा एक अंतर्यामी हरपला; हा सल, ही वेदना लवकर पुसता न येणारी. अलीकडे अशा कार्यतत्पर माणसांची टंचाईच सर्वत्र जाणवते. अशा पार्श्वभूमीवर वाढत जाणारं एक टवटवीत झाड अकस्मात उन्मळून पडतं हे फारच अनाकलनीय!

साहित्य परिषदेच्या पायऱ्या चढत असतानाचा त्यांचा 'जगदंब जगदंब' या घोषाचा नाद आजही कानात घुमत असतो, व त्याबरोबर त्यांचा हसरा चेहरा स्मरणात साठून राहतो. त्यांच्या बोलण्यातल्या मिष्कीलपणातली हलकीशी झालर मनात आजही तरळत असते. त्यांच्यातल्या पूर्वग्रहविरहित वृत्तीमुळेच त्यांच्या मनाला सुदृढपणा प्राप्त झाला होता. कुणी काही तक्रारवजा सूर लावला, तर हा माणूस त्यात कधीही भर घालत नसे. उलट 'जाऊ द्या हो', म्हणत समोरच्या माणसाच्या मनातली जळमटं काढण्याचा नेहमीच त्यांनी प्रयत्न केला. त्यामुळेच ते कधी 'गॉसिप'मध्ये रमले नाहीत. कधी कसली कावकाव नाही, असंतोष नाही. कुणाशी कधी चकमकी नाहीत. कारण आपल्या मनाच्या खिडक्या त्यांनी पूर्ण उघड्या ठेवल्या होत्या.

त्यांच्यातला अधोरेखित करण्याजोगा गुण म्हणजे स्वत:विषयी, स्वत:च्या वाङ्मयीन कारकीर्दीविषयी कधीही ते स्वमुखानं बोलत नसत. आत्मप्रौढी तर दूरच. एक चांगला समीक्षक, कवी, गझलेचा अभ्यासक, साहित्यातला जाणकार असूनही ते कधी आत्मप्रशंसक झाले नाहीत. 'गतिधारा' या त्यांच्या पुस्तकाच्या शीर्षकाप्रमाणे ते जीवनाच्या गतिधारेशी प्रांजळ राहिले. पण ती धारा अशी एखाद्या प्रपातासारखी आली आणि त्यांना आपल्या कवेत घालून घेऊन गेली, हे सत्य स्वीकारण्याखेरीज कोण काय करू शकतो?

**नंदा सुर्वे**

❑

## कार्यवृत्त

### (१ जुलै २००५ ते ३१ ऑगस्ट २००५)

### पुणे जिल्हा

**दि. ५ जुलै :** ०१ जुलै २००३ ते २६ जून २००५ या दोन वर्षांच्या कालावधीत महाराष्ट्र साहित्य परिषदेचे स्थानिक कार्यवाह या पदावर अतिशय उत्तम कार्य करणाऱ्या डॉ. मिरदेव गायकवाड यांचे २६ जून २००५ रोजी आकस्मिक निधन झाले. मंगळवार दि. ५ जुलै २००५ या दिवशी सायंकाळी परिषदेचे कार्याध्यक्ष डॉ. गं. ना. जोगळेकर यांच्या अध्यक्षतेखाली श्रद्धांजली सभा आयोजित करण्यात आली. प्रमुख कार्यवाह रवींद्र भट यांनी प्रास्ताविक केले. परिषदेचे परीक्षाविभागप्रमुख डॉ. कल्याण इनामदार यांनी श्रद्धांजली ठरावाचे वाचन केले. डॉ. मधुसूदन घाणेकर यांनी सूत्रसंचालन केले. परिषदेच्या कार्यवाह डॉ. कल्याणी दिवेकर, दीपक करंदीकर, प्रा. रतनलाल सोनाग्रा, डॉ. स्नेहसुधा कुलकर्णी, सौ. स्वाती सामक, सौ. अंजली कुलकर्णी, शाहू महाविद्यालयाचे प्रतिनिधी प्राध्यापक, सौ. प्रभा सोनवणे इत्यादी व्यक्तींनी श्रद्धांजलीपर भाषणे केली. तसेच परिषदेचे एक हितचिंतक व ज्येष्ठ नागरिक प्रा. खंडेराव केळकर यांचीही श्रद्धांजलीपर भाषणे झाली.

**१४ जुलै २००५ शिरोळे पारितोषिक –**

कै. प्रा. बाबुराव शिरोळे यांच्या स्मरणार्थ बालवाङ्मय क्षेत्रातील ज्येष्ठ लेखकास रु. २५०० चे तसेच कै. शांतादेवी शिरोळे यांच्या स्मरणार्थ रु. २००० चे लेखिका पारितोषिक देण्यात येते. यावर्षी डॉ. कल्याण इनामदार या बालसाहित्यकाराला कै. बाबूराव शिरोळे पारितोषिक देऊन गौरवण्यात आले. तसेच मेघना पेठे यांना शांतादेवी शिरोळे पारितोषिक देऊन सन्मानित करण्यात आले. समारंभाच्या अध्यक्षस्थानी विद्या बाळ होत्या. डॉ. गं. ना. जोगळेकर यांनी प्रास्ताविक केले. दीपक करंदीकर यांनी आभार मानले. नंदा सुर्वे यांनी सूत्रसंचालन केले. डॉ. धैर्यशील शिरोळे व चंद्रसेन शिरोळे हे देणगीदार समारंभाला उपस्थित होते.

**दि. ३० जुलै :** दरवर्षीप्रमाणे जुलै महिन्यात संत सावतामाळी स्मृतिदिन साजरा केला जातो. यावर्षी पुण्यातील प्रथितयश सुगमसंगीत गायक श्री. श्रीपाद भावे यांच्या भक्तिसंगीत गायनाचा बहारदार कार्यक्रम साजरा करण्यात आला. प्रास्ताविक प्रमुख कार्यवाह रवींद्र भट यांनी केले व कार्याध्यक्ष डॉ. गं. ना. जोगळेकर यांच्या हस्ते गुलाबपुष्प, श्रीफल देऊन

श्रीपाद भावे आणि त्यांचे सहकारी कलावंत यांचा सत्कार करण्यात आला. श्री. प्रसाद भावे, सौ. सुजाता ढेरे, रवी काशीकर, स्मिता काळे, हर्षकेश जाधव, प्राजक्ता भावे या सहकाऱ्यांनी श्रीपाद भावे यांच्या भक्तिसंगीत गायनास उत्तम साथ दिली. स्थानिक कार्यवाह दीपक करंदीकर यांनी आभार मानले.

**दि. २९ ऑगस्ट :** पु. भा. भावे स्मृतिसमिती आणि महाराष्ट्र साहित्य परिषद यांच्या संयुक्त विद्यमाने थोर साहित्यिक पु. भा. भावे यांच्या २५ व्या स्मृतिदिनाचा कार्यक्रम सोमवार दि. २९ ऑगस्ट रोजी परिषदेच्या पटवर्धन सभागृहात संपन्न झाला. या निमित्ताने भावे स्मृतिप्रीत्यर्थ विविध असे बहुमानाचे पुरस्कार प्रदान करण्यात आले व 'छत्रपती शिवरायांचे भव्य व्यक्तिमत्त्व आणि भावजीवन' या विषयावर डॉ. मुकुंद दातार यांचे ओघवत्या शैलीतील व्याख्यान आयोजित करण्यात आले. कै. पु. भा. भावे यांचे स्नेही आणि लेखक व स्मृतिदिन कार्यक्रमाचे अध्यक्ष श्री. पु. गोखले यांनी लिहिलेल्या 'महाराणी पद्मिनी' या कादंबरीचे प्रकाशन ज्येष्ठ लेखक व परिषदेचे प्रमुख कार्यवाह रवींद भट यांच्या हस्ते झाले. साहित्यसमीक्षा पुरस्कार, वक्तृत्व पुरस्कार, समाजसेविका पुरस्कार असे तीन बहुमानाचे पुरस्कार पु. भा. भावे स्मृतिसमितीतर्फे अनुक्रमे ज्येष्ठ समीक्षक प्रा. रा. ग. जाधव, वक्ते डॉ. मुकुंद दातार व नगरसेविका प्रा. सौ. मेधा कुलकर्णी यांना समारंभाचे अध्यक्ष श्री. पु. गोखले यांच्या हस्ते प्रदान करण्यात आले. पुरस्कार स्वीकारल्यानंतर तीनही वक्त्यांनी अत्यंत समर्पक शब्दांत आपले मनोगत व्यक्त केले.

कार्यक्रमाचे सूत्रसंचालन दूरदर्शनच्या प्रसिद्ध निवेदिका सौ. मंजिरी मराठे यांनी केले तर पुरस्कारविषयक निवेदन समितीचे एक कार्यवाह श्रीधर वि. सहस्त्रबुद्धे यांनी केले. परिषदेचे कार्याध्यक्ष डॉ. गं. ना. जोगळेकर यांनी प्रास्ताविक केले व स्थानिक कार्यवाह दीपक करंदीकर यांनी आभार मानले.

**२६ फेब्रुवारी २००५** रोजी नरहर कुरुंदकर स्मृती व सावरकर आत्मार्पण दिनानिमित्त प्रा. पुरुषोत्तम पाटील व प्रा. डॉ. सौ. सुषमा दाते यांचे व्याख्यान आयोजित केले होते. अध्यक्षस्थानी प्रा. सी. ब. रावळे हे होते. कार्यक्रमाचे सूत्रसंचालन प्रा. आशुतोष पाटील यांनी तर प्रास्ताविक प्रा. सौ. शशिकला पवार यांनी केले. पाहुण्यांचा परिचय श्री. गणेश पाठक यांनी तर आभार श्री. मोहन मोरे यांनी व्यक्त केले. कार्यक्रमास शहरातील मान्यवर साहित्यिक उपस्थित होते.

## धुळे जिल्हा

**१ एप्रिल २००५** रोजी कै. कवी विद्याधर वैद्य स्मृतिदिनानिमित्त खुल्या कविसंमेलनाचे आयोजन केले गेले होते. कविसंमेलनाचे अध्यक्षस्थानी मा. सौ. मीराताई धाराशिवकर होत्या. अनेक जुन्या व नव्या कवींनी आपल्या कविता सादर केल्या. सौ. प्रभा बैंकर (प्रथम) श्री. सतिश पेंढारकर (द्वितीय) तर श्री. दिवाकर चौकेकर (तृतीय) याप्रमाणे क्रमांक पटकावले.



अनुक्रमणिका







परीक्षक म्हणून प्रा. डॉ. मृदुला वर्मा, प्रा. आशुतोष पाटील यांनी काम पाहिले. कार्यक्रमाचे सूत्रसंचालन श्री. मोहन मोरे यांनी केले. प्रा. डॉ. सौ. शशिकला पवार यांनी प्रास्ताविक केले, तर श्री. गणेश पाठक यांनी आभार व्यक्त केले.

**८ एप्रिल २००५** कै. नगराज बोरसे स्मृतिदिनानिमित्त 'मराठी साहित्यिकांपुढील आव्हाने' या विषयावर म. रा. साहित्य व संस्कृती मंडळाचे अध्यक्ष मा. प्रा. रा. रं. बोराडे यांचे व्याख्यान आयोजित केले होते. अध्यक्षस्थानी जयहिंद महाविद्यालयाचे प्राचार्य डॉ. के. बी. पाटील हे होते.

**दि. ४ जून २००५** रोजी सौ. अश्विनी गरुडलिखित 'दूरस्थ' या काव्यसंग्रहाचे प्रकाशन मा. कविवर्य पद्मश्री ना. धों. महानोर यांचे हस्ते करण्यात आले. प्रमुख अतिथी म्हणून प्रा. डॉ. सौ. प्रभा गणोरकर, प्रा. डॉ. भगवान ठाकूर, आनंदराव साळुंखे व उन्मेष प्रकाशनच्या (पुणे) मा. मेधा राजहंस हे होते. अध्यक्षस्थानी प्रा. पुरुषोत्तम पाटील हे होते. अतिशय रंगतदार अशा सोहळ्याचे प्रास्ताविक प्रा. डॉ. सौ. शशिकला पवार, सूत्रसंचालन प्रा. दिलीप चव्हाण यांनी केले. तर श्री. मोहन मोरे यांनी आभार व्यक्त केले. प्रसंगी कवयित्री अश्विनी गरुड यांनी आपल्या काही निवडक कवितांचे वाचन केले. कार्यक्रमास शहरातील विविध संस्थांचे पदाधिकारी, साहित्यिक, कवी व मान्यवर उपस्थित होते.

**मोहन चं. मोरे**
कार्यवाह, धुळे शाखा

## कोरेगाव शाखा

महाराष्ट्र साहित्य परिषद शताब्दीनिमित्ताने प्रा. डॉ. शिवाजी विष्णू पाटील, प्रपाठक, मराठी विभाग, छ. शिवाजी कॉलेज, सातारा, यांनी, 'ज्ञानेश्वरी' : एक साहित्यिक लेणे' या विषयावर कोरेगाव येथे सावरकर भवनमध्ये सायं. ६.३० वा. व्याख्यान दिले.

दि. २७ जून २००५ प्रा. बाबासाहेब नाईक, अनिल बोधे, शंकर ह. जगदाळे यांची प्रमुख उपस्थिती होती. अध्यक्षस्थानी श्री. भोसले मारुती भिकू शाखा अध्यक्ष होते.

दि. १८ जुलै २००५ – म.सा.प. शाखा–पदाधिकारी मीटिंग– साहित्यिक मिरदेव, गायकवाड सार्वजनिक वाचनालय, कोरेगाव, स्मृत्यर्थ ग्रंथालय सुरू करणेबाबत ठराव संमत.

दि. २५ जुलै २००५ रोजी अनिल बोधे यांनी लिहिलेल्या 'झाडांचे जगणे असे' या काव्यसंग्रहाचे प्रकाशन कोरेगाव येथे श्री. गोरख चव्हाण, अध्यक्ष शिवकृपा पतपेढी, मुंबई, प्रा. श्रीधर साळुंखे, डॉ. रमेश पाटील, डॉ. राजेंद्र पवार, गजानन शंकर बगाडे, सुधाकर सखाराम वेळापुरे, चंद्रकांत मोहिरे, श्री. मारुती भिकू भोसले आणि म.सा.प. पदाधिकारी उपस्थित होते.

**सभा इतिवृत्त दि. २७ जुलै २००५ म.सा.प. शताब्दीनिमित्ताने व्याख्यान.**

प्रा. डॉ. उदयसिंह रामचंद्र जाधव, शहाजीराजे महाविद्यालय, खटाव यांचे 'विसाव्या शतकाप्रारंभीचे स्त्रीजीवन आणि विभावरी शिरुरकर यांचे वाङ्मय' या विषयावर व्याख्यान झाले. डॉ. श्रीनिवास श्रीपाद कात्रे, प्रा. पांचागणे प्रमुख पाहुणे म्हणून उपस्थित होते.

**दि. २७ ऑगस्ट २००५– म.सा.प. शाखावृत्त**

सौ. स्मिता आजेगांवकर, संगीत विभाग प्रमुख राजर्षी शाहू महाविद्यालय, लातूर, यांचे गोपालकृष्ण उत्सवानिमित्ताने कीर्तन आयोजित करण्यात आले. श्री. गंगाधर देव, नांदेड, पराग पांडव, प्रा. नीतिन बानुगडे पाटील आदि उपस्थित होते.

**मा. भि. भोसले**

अध्यक्ष, कोरेगाव शाखा

## डोंबिवली शाखा

ज्येष्ठ साहित्यिक अनंत काणेकर, मालतीबाई बेडेकर आणि संस्कृति-ज्ञानकोषकार पं. महादेवशास्त्री जोशी यांच्यावर आयोजित व्याख्यानमाला दि. २८ ते ३० एप्रिल २००५ या कालावधीत आयोजित झाली.

अनंत काणेकरांवरील प्रथम पुष्प गुंफताना श्री. ना. दा. ठाकरसी महाविद्यालयाच्या प्राध्यापिका वर्षा लोखंडे यांनी लेखकाची थोरवी अनेक उदाहरणांनी पटवून दिली.

सौ. मालतीबाई बेडेकर या विषयावर डॉ. अनघा जोशी यांनी व्याख्यान रंगविले. त्यांनी प्रामुख्याने लेखिकेचा त्या वेळचा काळ व साहित्यनिर्मिती यावर भरभरून चर्चा केली.

अखेरचे पुष्प गुंफताना मा. अशोक जोशी यांनी पं. महादेवशास्त्री जोशी यांचा जीवनपट उलगडून दाखवला. रसिक श्रोते त्यांच्याशी एकजीव झाले होते. तीनही दिवसांत रसिकांची गर्दी होती. सदर कार्यक्रम केळकर मार्गावरील 'चित्तपावन ब्राह्मण संघात' सायंकाळी ६.३० वाजता आयोजित केले होते. कार्यकारिणीच्या सदस्यांनी हा कार्यक्रम यशस्वी केला.

**प्रा. प्रभात शिरसेकर**

कार्यवाह, डोंबिवली शाखा

---

## साभार पोच

**आठवणींच्या हिंदोळ्यावर :** पुष्पलता रानडे, प्रकाशक, सुरेश वसंत देशपांडे, पुणे, पृष्ठ ३१४

**भावस्पंदने :** विजयादेवी पटवर्धन, प्रकाशिका विजयादेवी पटवर्धन, पुणे, पृष्ठ ३३४

**राजप्रासादाची वास्तू :** विजयादेवी पटवर्धन, प्रकाशिका विजयादेवी पटवर्धन, पुणे, पृष्ठ ९४

## देणगीदारांची यादी

| | | | |
|---|---|---|---|
| १) डॉ. श्रीकांत मधुकर केळकर | १०२५/- | ३३) अंजली राजेश बेरी | १००/- |
| २) द. पं. जोशी | १०००/- | ३४) प्रभाकर गोविंद कामत | १०१/- |
| ३) डॉ. प्रभाकर नारायण कुंभारे | १००/- | ३५) नीला मोहन पालकर | २००/- |
| ४) मोहन बा. संकपाळ | १००/- | ३६) नितीन मधुकर बेलसरे | १००/- |
| ५) सुरेश दत्तात्रय कुलकर्णी | १००/- | ३७) प्रल्हाद विठ्ठल देशमुख | १५१/- |
| ६) बाळकृष्ण दत्तात्रय ठाकूर | १०१/- | ३८) वसंतराव कृष्णाजी शिंदे | १००/- |
| ७) वसंत शंकर कोरडे | १०१/- | ३९) रामचंद्र दामोदर वाघ | १००/- |
| ८) श्रीकांत भास्कर काकडे | १००/- | ४०) पी. पी. जोशी | १००/- |
| ९) नारायण त्र्यंबक उपासनी | १००/- | ४१) गणेश विठ्ठल वरेकर | १००/- |
| १०) माधवी माधव आपटे | १००/- | ४२) किशोर नारायण महाराज | १००/- |
| ११) अ‍ॅड राजाराम दगडू कुलकर्णी | १००/- | ४३) पांडुरंग काशिनाथ वागळे | ५५५५/- |
| १२) प्रभाकर दत्तात्रय काळुसकर | ५०१/- | ४४) डॉ. अरुणा रामचंद्र ढेरे | १०००/- |
| १३) मधुकर कुलकर्णी | २००/- | ४५) डॉ. पां. श्री. घारे | २५००/- |
| १४) शशिकांत श्रीराम संभूस | १००/- | ४६) डॉ. सु. प्र कुलकर्णी | २००/- |
| १५) नलिनी प्र. दसनूरकर | १००/- | ४७) अरविंद संगमनेरकर | २४००/- |
| १६) सुरेश नारायण कुलकर्णी | १००/- | ४८) मनोहर गोविंद बोडस | ५००/- |
| १७) मधुकर शंकर अभ्यंकर | १००/- | ४९) डॉ. सुशीला पाटील | १०११/- |
| १८) डॉ. श्रीकांत मधुकर जोशी | १००/- | ५०) सुनीता महाजन | ११२/- |
| १९) पुरुषोत्तम श्रीधर उपाध्ये | १००/- | ५१) वसुधा नारायण पटवर्धन | १००/- |
| २०) अ‍ॅड. वसंत नारायण उंडे | १००/- | ५२) ललिता विश्वास नातू | १००/- |
| २१) गोपाळ रामचंद्र चिपाडे | १००/- | ५३) प्रभा ज्ञानेश्वर आळवेकर | १००/- |
| २२) डॉ. हणमंत नारायण कुंदेन | १००/- | ५४) वैशाली संपत कुंजीर | १००/- |
| २३) मुक्ता श्रीखंडे | २५१/- | ५५) नलिनी विठ्ठल आवटे | १००/- |
| २४) डॉ. चंद्रकांत वांदिवडेकर | ५०००/- | ५६) पुष्पा जे. चौगुले | १००/- |
| २५) पं. वसंत अ. गाडगीळ | १०१/- | ५७) डॉ. अरविंद लेले | २५०००/- |
| २६) डॉ. अ. पां. दाणी | २००/- | ५८) राघवेंद्र प्रल्हाद दाणी | ५०१/- |
| २७) रमाकांत मुरलीधर दहीभाते | ५०१/- | ५९) हेमंत जोशी | ५०००/- |
| २८) धनंजय नागरी सह. पतसंस्था | १०१/- | ६०) ज. वि. जोशी | १०००/- |
| २९) भालचंद्र गोपाळ ढमढेरे | १००/- | ६१) अरविंद नीलकंठ नवरे | १०००/- |
| ३०) अशोक रा. निमगावकर | १००/- | ६२) रवीन्द्र बेडकीहाळ | १०००/- |
| ३१) प्रकाश लक्ष्मण श्रीखंडे | १०१/- | ६३) डॉ. विद्याधर ज. नारगोलकर | १००/- |
| ३२) नारायण रामचंद्र चिपळूणकर | १००/- | ६४) पांडुरंग कृष्ण देवधर | १११/- |

| | | | |
|---|---|---|---|
| ६५) प्रशांत शांतीरप्पा औटी | १००/- | ६९) एल. जी गांधी | १००/- |
| ६६) अनंत विष्णु भागवत | १००/- | ७०) श्रीकांत गोविंद थोरवोले | १००/- |
| ६७) पद्माकर वसंत समेळ | १००/- | ७१) रामचंद्र ना. लळिंगकर | १००/- |
| ६८) भालचंद्र विश्वनाथ | १००/- | | |

❑

## आजीव सभासद यादी

१) क्षीरसागर वैशाली शशिकांत, पुण
२) चटणे सुभाष दत्तात्रय, चिंचवड-पिंपरी
३) शिंदे मीना संजय, चिंचवड
४) शिगाडे भगवान रामचंद्र, चिंचवड
५) दास्ताने संतोष रामचंद्र, पुणे
६) चिमोटे मोना, अमरावती
७) टिळक दीपक जयंत, पुणे
८) टिळक रोहित दीपक, पुणे
९) डोंगरे निलेश दिनकर, पुणे
१०) वानखेडे चंद्रकांत रामदास, पुणे
११) प्रभुदेसाई प्रभाकर विश्वनाथ, पुणे
१२) मराठे अमृता हनुमंत, पुणे
१३) उपाध्ये विद्या विनायक, सांगवी
१४) शिंदे भगवान दत्तू, देऊळगांवराजा
१५) भालेराव विमल जयवंत, अकोला
१६) कुंभोजकर अशोक शामराव, पुणे
१७) ताम्हणकर सुधीर द., मुंबई
१८) पाटील जगदीश सदाशिव, कांदळ
१९) फेगडे अजित मुकुंद, अंबरनाथ
२०) फेगडे जयश्री मधुकर, अंबरनाथ
२१) जमेनिस जयश्री रवीन्द्र, अंबरनाथ
२२) पाटील आशा बापू, अंबरनाथ
२३) इंगेवार मधुकर गंगाधर, अंबरनाथ
२४) कुलकर्णी स्वाती नितीन, अंबरनाथ
२५) खानवलकर मुक्ता विनोद, अंबरनाथ
२६) कानगो विनय राहुल, पुणे
२७) फडके श्रीकांत हरि, पुणे
२८) कुलकर्णी किरण रामचंद्र, पुणे
२९) गोसावी रमेश बाळकृष्ण, पुणे

❑






अनुक्रमणिका











डॉ. हेमंत विष्णू इनामदार यांचे वयाच्या ८० व्या वर्षी, गुरुवार, दि. २३ जून २००५ रोजी पहाटे ५ च्या सुमारास दीर्घ आजाराने निधन झाले.

डॉ. इनामदार मूळ खटाव (जि. सातारा) येथील रहिवासी. त्यांचे वडील प्राथमिक शिक्षक होते. लहानपणापासून लेखन-वाचनाचे संस्कार त्यांच्यावर झाले होते. बी.ए., एम. ए. व एलूएलू.बी. या पदव्या त्यांनी संपादन केल्या. 'संत नामदेव' या विषयाचा सर्वांगीण अभ्यास करून त्यांनी पुणे विद्यापीठाची पीएच्.डी. ही पदवी संपादन केली. १९५४ ते १९८५ या काळात त्यांनी श्रीमती नाथीबाई दामोदर ठाकरसी महाविद्यालय, पुणे येथे मराठीचे प्राध्यापक व विभागप्रमुख म्हणून काम केले. प्रथम उपप्राचार्य व १९७५ पासून 'प्राचार्य' ही पदे त्यांनी भूषविली. प्रा. गं. बा. सरदार यांचे ते सहकारी होते. त्यांच्या सहवासाचा डॉ. इनामदार यांच्यावर वैचारिक परिणाम झाला होता. निवृत्त झाल्यानंतर 'सुप्रतिष्ठ प्राध्यापक व संशोधन मार्गदर्शक' (प्रोफेसर इमॅरिटस) हा बहुमान त्यांना प्राप्त झाला होता. इंग्रजी, मराठी व संस्कृत या भाषांचा व्यासंग असलेले ते एक कुशल प्राध्यापक होते. उत्कृष्ट प्रशासक म्हणूनही त्यांची योग्यता मोठी होती. शिस्तप्रिय स्वभाव, सौजन्यपूर्ण वागणूक आणि उपक्रमशीलता यांमुळे त्यांनी चांगला लौकिक संपादन केला होता. एस.एन.डी.टी. विद्यापीठातील ११ विद्यार्थिनींना पीएच्.डी. पदवीसाठी त्यांनी यशस्वीपणे मार्गदर्शन केले होते. या सर्व विद्यार्थिनींनी 'प्रबंध एकादशी' हा ग्रंथ सिद्ध करून तो डॉ. इनामदार यांना त्यांच्या अमृत महोत्सवीवर्षात अर्पण केला होता.

डॉ. इनामदार यांचा अनेक शैक्षणिक व साहित्यिक संस्थांशी संबंध आला होता. १९६६-६७ या वर्षी खटाव येथे स्थापन झालेल्या महाविद्यालयाचे पहिले प्राचार्य हे पद स्वीकारून त्या ग्रामीण महाविद्यालयाला सुयोग्य असा आकार त्यांनी दिला.

म.सा. परिषदेच्या कार्यकारी मंडळाचे ते अनेक वर्षे सदस्य होते. १९७६ ते १९७९ या काळात म.सा. पत्रिकेचे संपादक म्हणून त्यांनी काम केले. चिकित्सकता आणि रसिकता या गुणांमुळे त्यांची संपादकीय कारकीर्द नावाजली गेली. संपादक म्हणून काम करताना त्यांनी अनेक नवनव्या लेखकांना उत्तेजन दिले. यातून त्यांची लोकसंग्राहक वृत्ती प्रकट झाली. आपल्या आयुष्यातील शेवटची १०-१५ वर्षे 'गीताधर्म मंडळा'चे अध्यक्ष म्हणून त्यांनी काम केले. गीता व ज्ञानेश्वरी यांच्या परीक्षा सुरू करून त्यांनी या ग्रंथांच्या अभ्यासालाही चांगली चालना प्राप्त करून दिली.



अनुक्रमणिका

१९८८ ते १९९२ या काळात म.सा. परिषदेचे उपाध्यक्षपद त्यांनी भूषविले. या निमित्ताने परिषदेच्या व्यासपीठावरून अनेक सभांचे अध्यक्ष म्हणून त्यांनी काम केले. १९७७ ते १९९० मध्ये पुण्यात झालेल्या साहित्य संमेलनाच्या जबाबदारीचा मोठा वाटा त्यांनी उचलला होता. १९७७ मधील 'पुण्याई' या स्मरणिकेच्या संपादनाची जबाबदारी प्रा. गो. म. कुलकर्णी यांच्यासह त्यांनी उचलली होती.

डॉ. इनामदार यांचे ग्रंथ-कर्तृत्व विविध प्रकारचे आहे. त्यांच्या पीएच्.डी. संशोधनाचे 'संत नामदेव' हे प्रकाशन केसरी संस्थेतर्फे झाले होते. संत साहित्याची त्यांना विशेष आवड होती. संत ज्ञानेश्वरांपासून बहुतेक सर्व संतांच्या कार्याचे अभ्यासपूर्ण विवेचन त्यांनी केले होते. 'नामदेव दर्शन' या ग्रंथाचे संपादन त्यांनी डॉ. निवृत्तिनाथ रेळेकर आणि डॉ. निशिकांत मिरजकर यांच्या सहकार्याने पार पाडले होते. मराठीतील हा एक उत्कृष्ट संदर्भग्रंथ मानला जातो.

डॉ. इनामदार यांनी इतरांच्या सहकार्याने व स्वतंत्रपणे अनेक संपादने केली–

१) 'संत एकनाथ दर्शन'

२) 'श्री नामदेव दर्शन'

३) 'नामदेवांची अभंगवाणी'

४) 'शरश्चंद्र चटर्जी–एक दर्शन'

५) 'साहित्य वैभव'

हे त्यांचे आणखी काही उल्लेखनीय संपादित ग्रंथ होत.

१९६४ मध्ये हरी नारायण आपटे यांच्या जन्मशताब्दी निमित्ताने त्यांनी 'हरिभाऊ : व्यक्ती आणि वाङ्मय' या ग्रंथाचे संपादन केले होते. १९७९ मध्ये 'प्रा. गं. बा. सरदार जीवन आणि कार्य' हा महत्त्वाचा ग्रंथ त्यांनी संपादित केला. मराठीतील लेखिकांच्या कथांचे संपादन 'विस्तारलेले क्षितिज' या शीर्षकाने डॉ. अंजली सोमण यांच्या सहकार्याने त्यांनी केले होते. 'भाषाविज्ञान : वर्णनात्मक व ऐतिहासिक' याही ग्रंथाच्या संपादनात डॉ. कल्याण काळे व डॉ. अंजली सोमण यांच्या बरोबरीने त्यांचा सहभाग होता. डॉ. इनामदार यांना परिषदेची श्रद्धांजली.

**रवीन्द्र भट**

प्रमुख कार्यवाह, म.सा.प., पुणे

❑










## सौभद्र नाटकाचा शताब्दी निमित्त नि:शुल्क प्रयोग

महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या शतक महोत्सवी वर्षानिमित्त रविवार, **दिनांक २ ऑक्टोबर २००५ रोजी दुपारी ४ वाजता** पुणे येथील भरतनाट्य संशोधन मंदिरात **'संगीत सौभद्र'** या रसिकप्रिय नाटकाचा प्रयोग आयोजित केला आहे. परिषदेचे आजीव सदस्य, देणगीदार, हितचिंतक यांच्यासाठी हा प्रयोग विनामूल्य असून आजीव सदस्यांनी दि. २० सप्टेंबर २००५ पासून ते दि. ३० सप्टेंबर २००५ पर्यंत सुटीचे दिवस सोडून दररोज सायंकाळी ६ ॥ ते ८ या वेळात आपली सन्मानिका घेऊन जावी. प्रत्येक सदस्यास दोन सन्मानिका देण्यात येतील. सर्वांनी या सांस्कृतिक उपक्रमाचा लाभ घ्यावा.

प्रमुख कार्यवाह

---

## साभार पोच

**आजचा विद्यार्थी :** पुंडलिक गवंडी, वाङ्मय सेवा प्रकाशन, नासिकरोड, पृष्ठ १२८
**कवितेच्या ईश्वरा आणि दिघी :** नरेंद्र भागवत, वाङ्मय सेवा प्रकाशन, नासिकरोड, पृष्ठ ९६
**क्षितिजाच्या पलीकडे :** पुंडलिक गवंडी, वाङ्मय सेवा प्रकाशन, नासिकरोड, पृष्ठ १२०
**सुजनवेध :** रवींद्र कानडेज, प्रवाह प्रकाशन, बुलढाणा, पृष्ठ ९२
**मराठी भाषेचे मूळ :** विश्वनाथ खैरे, प्रकाशक उमादेवी खैरे, पुणे, पृष्ठ ११२
**मृगजळ :** रेखा मगर, प्रकाशक नारायणराव मगर, उस्मानाबाद, पृष्ठ ५८
**तुका वक्ति :** गजानन ना. पळसुले, शब्दगौरव प्रकाशन, पुणे, पृष्ठ १००
**जगाला प्रेम अर्पावे :** ना. धों. महानोर, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई, पृष्ठ ४८
**डोळस :** अनंत कदम, स्वागत प्रकाशन, वसई रोड, पृष्ठ ६०
**काबुलीवाल्याची बंगाली बायको :** अनुवाद- मृणालिनी गडकरी, मेहता पब्लिशिंग हाऊस, पुणे, पृष्ठ १५०
**टाइम लाइन :** अनुवाद- प्रमोद जोगळेकर, मेहता पब्लिशिंग हाऊस, पुणे, पृष्ठ ५२२
**फरासि प्रेमिक (फ्रेंच प्रेमिक) :** अनुवाद- सुप्रिया वकील, मेहता पब्लिशिंग हाऊस, पुणे, पृष्ठ ३१८

अनुक्रमणिका






Maharashtra Sahitya Partrika Quarterly-July-Sept. 2005 Registered with the Registrar of Newspapers for India Under N0, 6398/57

बुक पोस्ट

प्रती

प्रेषक : प्रमुख कार्यवाह

**महाराष्ट्र साहित्य परिषद** टिळक रस्ता, पुणे- ४११ ०३०.



**महाराष्ट्र साहित्य पत्रिकेचा**
खप आजमितीला साडेसात हजारावर असून
तिचे संचार-क्षेत्र भारतभर पसरलेले आहे.
चेन्नई ते काश्मीर आणि कांडला ते कोलकता इतके ते विस्तृत झालेले आहे.
प्रत्येक राज्यात 'पत्रिका' जातेच जाते.
जाहिरातदारांनी आवर्जून लक्षात घ्यावी अशी
ही बाब असल्याने तिची नोंद केली आहे.

## जाहिरातीचे दर

| | |
|---|---|
| आतील पूर्ण पान | रु. २०००/- |
| आतील अर्धे पान | रु. ११००/- |
| आतील पाव पान | रु. ६००/- |
| वेष्टन पृष्ठ क्र. २ व ३ (दोन रंग) प्रत्येकी | रु. ४०००/- |
| वेष्टन पृष्ठ क्र. ४ अर्धे पान (दोन रंग) | रु. ५०००/- |

## तांत्रिक माहिती

पानाचा आकार
१९ x १३ सें. मी. (डेमी)
छापील पानाचा आकार
१६ x १० सें. मी.
कॉलम : दोन
छपाई : ऑफसेट पद्धतीने
जाहिरातीचा मजकूर किंवा
आर्टपूल रंगीत जाहिरातीसाठी
पॉझिटिव्ह






